


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# दी
# पा
# व
# ळी

साहित्य
कला
संस्कृति




## श्रेयनामावळि





संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्र





भाद्रपद शके १८८२ सप्टेंबर १९६०

# श्री भगवान अमिताभ

बुद्धाच्या जन्मापूर्वी म्हणजे सुमारें अडीच हजार वर्षांपूर्वी भारतखंडाची स्थिति अशी होती. कोसल, मगध, अवंती, वत्स, वाराणसी, अंग, गंधार, कांबोज, मत्स्य, पांचाल, कुरु, शूरसेन, अश्मक, वज्जी, मल्ल, शाक्य, कोळी. यावेळीं रूढ अशा वैदिक धर्मातील तत्त्वज्ञानाचा लाभ फक्त त्रैवर्णि-कांसच आणि त्यांतहि त्यांतल्या उच्च समाजास मिळत होता. आर्येतरांस तो मिळूं शकत नव्हता. कालांतरानें परिणाम असा झाला कीं, वैदिक धर्मांतल्या आचारविचारांस विकृत स्वरूप प्राप्त झालें. या स्वरूपाची परिणती विचित्र झाली. वैदिक धर्म ही फक्त आमची मक्तेदारी असें सांगणाऱ्यांविरुद्ध बंडखोर असे डझनावारी नास्तिक पंथ निर्माण झाले. या नास्तिक पंथांत चार्वाक, दैववादी, शून्यवादी, अनात्मवादी, उच्छेदवादी असे पंथ अग्रणी होते. त्यांच्या बळकट अशा प्रचारकार्यानें भारतांत आचारविचारांच्या बाबतींत जिकडे तिकडे भयंकर गोंधळ माजला. जिकडे तिकडे बेबंदशाहीला भरती आली. आणि हळू हळू वैदिक धर्माबाबत लोकमत वाईट होऊन मंत्रविद्या, पिशाच्चविद्या, जारणमारण, जुगार, सुरापानादि व्यसनें आदि गोष्टींस भलतेंच प्राधान्य मिळून अनागोंदी आचारविचारांची एक प्रचंड लाट उसळली. आर्यधर्माचा उच्छेद होत चाललेल्या त्या स्थितीला आवर घालणारा मंत्रद्रष्टा कुणीहि निर्माण झाला नव्हता. सगळीकडे अशी अंधकारमय धर्मग्लानीची स्थिति झाली होती. अशा वेळीं शाक्य राजाच्या कुलांतल्या शुद्धोधन राजाला पट्टराणी मायादेवीपासून दैदिप्यमान असा पुत्र झाला. त्यानें मुलाचें नांव सिद्धार्थ. तो जन्मल्याच्या सातव्या दिवशीं एकाएकीं त्याची आई मायादेवी मरण पावली. मरतांना तिनें आपली बहीण गोतमी हिच्या ओटींत सिद्धार्थाला घालून पुत्रवत् पालन करण्याबद्दल विनंति केली होती. पुढें गोतमीनेंही प्राणापलीकडे जपून सिद्धार्थाला वाढवला. त्यामुळें सिद्धार्थाला गोतम असें नांव प्राप्त झालें. आणि पुढें बोधिवृक्षा-खालीं संबोधि—अर्थात् सम्यक ज्ञान—प्राप्त झालें म्हणून सम्बुद्ध अथवा बुद्ध असें सुप्रसिद्ध नांव प्रचारात पडलें.

अगदीं बालपणापासूनच बुद्धाची वृत्ति विरागी तशीच कुशाग्र. वयाच्या आठव्या वर्षापासून त्यानें वेद, छंद, पुराण, इतिहास, सांख्य, योग, न्याय, व्याकरण, मल्ल, धनु, शस्त्र, अस्त्रादि विद्यांचा अभ्यास करून लवकरच तो तरबेज झाला. विसाव्या वर्षीं सर्व विद्या पारंगत होऊन कपिलवस्तू येथील दंडपाणी राजाची कन्या यशोधरा हिला त्यानें स्वयंवरांत जिंकून तिच्याशीं विवाह केला.

विवाहानंतर जरी त्याच्या पायाशीं सर्व सुखें लोटांगण घालून सेवेला सज्ज होतीं, तरी विषयसंगतींत त्याचें मन रमत नव्हतें. एकांतवास त्याला अधिक प्रिय होत होता. एकांतांत बसून गंभीर विचार करणें, त्यागी, विरागी वृत्तीनें राहाणेंच त्याला विशेष प्रिय होतें. एके दिवशीं नगर संचारार्थ तो बाहेर पडला असता संसार दुःखानें पीडित झालेलीं अनेक शरीरें त्याला दिसल्यामुळें, संसार म्हणजे षडरिपूंना आवाहन, संसार म्हणजे रोग, ताप, पीडा, जरा, मरणादि दुःखें, असा एक विलक्षण परिणाम त्याच्या मनावर झाला. त्यांतच त्याला एक प्रव्राजक भेट-ल्यानें, आणि अज्ञानांधकाराचा नाश करणारा अमृतमय दिव्य असा उपदेश त्यानें केल्यानें, विरक्ति द्विगुणीत झाली. प्रपंचांत त्याला सर्वत्र दुःखच दिसूं लागलें. व एके रात्रीं सर्व आप्तइष्ट, राजवैभव व प्रिय वस्तूंचा त्याग करून गुप्तपणें तो घरांतून बाहेर पडला व प्रव्राजक बनला.

दुःखविमुक्तीचें श्रेष्ठ असें ज्ञान प्राप्त व्हावें म्हणून देहदंडण करून त्यानें घोर तपःश्चर्या केली, योगसाधन केलें. अखेर श्रेष्ठ समाधि साध्य करून घेऊन त्या समाधिस्थितींतच त्याला सम्बोधि प्राप्त झाली. व दुःखविमुक्तीचें सम्यग् ज्ञान प्राप्त होऊन भवचक्रांतून त्याची सुटका झाली.

आपल्यापुरतें एवढेंच करून तो स्वस्थ बसला नाहीं. आपल्या-प्रमाणेंच इतर लोकांनाहि दुःखांतून मुक्त करण्याकरितां तो फिरून लोकांत आला. आणि देशोदेशीं, गांवोगांवीं फिरून आपल्याला झालेल्या ज्ञानाचा तर्कशुद्ध असा सरळ सोप्या भाषेंत मुमुक्षु लोकांना

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



श्रीभगवान अमीताभ

जाऊं नये तडा तुझ्या
दिव्य स्थित प्रज्ञतेला
देतो आहे म्हणोनी रे
शब्द स्नेहाचा हा तुला !
रात्र आली डोईवर
पात्र घडीचें भरलें !
निघा...निघा...बोधिसत्वा,
मागें कांहीं न राहिलें !

मागें वळूनी वळूनी
आतां कांहीं न पहाणें !
विरक्तीला तुमच्या या
आतां कांहीं न दिसणें !
चला तिर्थंकरा...चला
कृतकृत्यार्थ होण्याला,
अतळाचा तळ काढा
संसार हा झाला शिळा...

—सदानंद रेगे



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उपदेश करूं लागला. लोकांना हा सरळ सोपा उपदेश पटला. त्यामुळें वैदिकधर्मानुयायांच्या माजोरी वृत्तीस विटलेल्या त्या लोकांना त्याचे तत्त्वज्ञान पटलें. ते त्याचे शिष्य बनूं लागले. उपासक झाले. त्याचा पंथ वाढूं लागला. एक वेगळा धर्मपंथ निर्माण झाला. गरीब-श्रीमंत, राव-रंक, स्त्री-पुरुष असा या पंथांत भेदाभेद नसल्यामुळें, सर्व दर्जाची मंडळी या नवपंथांत समाविष्ट झाली आणि त्यांच्या त्यांच्या योग्यते-प्रमाणें उपदेश करून बुद्धानेंहि आपल्या पंथाचा दरवाजा सर्वांना मोकळा ठेवला. बुद्धाचा धर्म अत्यंत साधा, सोपा व आचरणसुलभ आहे. अंधश्रद्धेला येथें वाव नाहीं. अनुभव हाच धर्म अशी त्याची व्याख्या आहे. बुद्ध हा केवळ मार्गदर्शक. फक्त चारच आर्य सत्यें; तीं प्रत्येकानें आपापल्या प्रयत्नाने मिळवायची एवढेंच. त्या धर्माचें मुख्य वैशिष्ट्य म्हणजे विश्वप्रेम. कोणत्याहि प्राण्याला दुःख पीडा देऊं नये. सर्व प्राणीमात्रांवर समदृष्टि ठेवावी, हिंसात्मक यज्ञयाग हें सत्कर्म नव्हे तर अहिंसेचा प्रचार करून बहुजनहिताय, बहुजनसुखाय अशी विश्वबंधुत्वाची मंगल कल्पना प्रत्यक्ष व्यवहारांत वाढीला लावणें. वैदिक धर्मातील बहुमोल विचारांचा वापर त्यानें आपल्या पंथांत सढळपणें केला. आणि उपनिषदादि तत्वज्ञानावर आपल्या नवधर्माचा पाया भक्कम करून दैववादी, अनात्मवादी, शून्यवादी, उच्छेदवादी पाखंडी पंथांचा निषेध करून त्यांच्या वाढत्या सामर्थ्यास आळा घातला.

वयाचीं ऐंशीं वर्षें पर्यंत सदुपदेश करीत भगवान बुद्ध कुशीनार गांवच्या सालवनांत परिनिर्वाण पावले. भगवान बुद्ध गेले तरी पट्टशिष्य आनंद याला सांगितलेलीं चार पुण्यस्थानें मागें राहिलीं. तथागत जिथें जन्मले ती कपिलवस्तु, त्यांना संबोधि प्राप्त झाली तें स्थान म्हणजे बुद्धगया, तथागतांनीं धर्मचक्र प्रवर्तन केलें ती वाराणशी, व तथागतांचें परिनिर्वाण जिथें झालें ती कुशीनार.

भगवान् बुद्धाच्या पश्चात त्यांच्यासारखा प्रभावशाली नेता अगर शास्ता कुणीहि न राहिल्यामुळें खुद्द त्यांच्याच अनुयायांत मतभेद वाढून पुढें रणें माजलीं व संघांत फाटाफूट झाली, व वेगवेगळे पंथ निर्माण झाले. मात्र सम्राट अशोकानें आटोकाट प्रयत्न करून भगवानांच्या शिकवणुकीला शिलालेखाच्या रूपानें चिरस्थायी करून ठेवलेले. आणि पुढें बुद्ध धर्माचा प्रसार आशिया खंडभर झाला.

अशोकानंतर बुद्ध धर्मात दोन तट पडले. महायान व हीनयान अशीं त्यांचीं नांवें. उत्तर हिंदुस्थान, चीन, तिबेट, जपान इत्यादि देशांत महायान पंथी असून दक्षिण हिंदुस्थान, सिलोन, जावा वगैरे देश हीनयान पंथाचे आहेत.

राहून राहून एक विचार असा येतो कीं अत्यंत खोलवर रुजवलेल्या बुद्ध धर्माचीं पाळेंमुळें हिंदूधर्म विनासंघर्ष कशीं उखडून टाकूं शकला? वास्तविक त्याचें स्वरूप उपनिषदांतील वेदांताशीं फारकत करणारें नव्हतें. दुसऱ्यावर त्या धर्माची सक्तीहि नव्हती, जबरदस्तीहि नव्हती.

पंडित जवाहरलाल नेहरूंनीं यावर एक सुंदर काव्य केलेलें आहे. 'हिंदु धर्मात एक अशी अद्‌भुत शक्ति आहे कीं ज्या एखाद्या नव्या गोष्टीचं त्याला आकर्षण वाटलें ती गोष्ट तो शीघ्र ग्रहण करतो; परंतु जितक्या लौकर ती तो ग्रहण करतो तितक्याचं लवकरं ती तो पचवूनहि टाकतो. त्याची पचनशक्तीहि तेवढीच जबरदस्त आहे. आणि म्हणूनच अशा एखाद्या दिव्य शक्तीला हिंदुस्थान ईश्वराचाच अवतार मानतें, व पूजास्थानीं त्याची स्थापना होते.' • • •


# कन्या, बहिण, कान्ता, माता...

या सर्व भूमिकांमध्यें तुम्ही स्त्रिया अपरिमित सहनशक्तीनें वागतां, पण याचा अर्थ मुग गिळून दुःख सोसायचें.
कोणत्याहीं कारणानें आलेली क्षीणता, खोकला, संग्रहणी व शरिरांतील कडकी दूर होऊन शरिर निरोगी बनविण्यासाठीं वैद्य एच्. के. सत्री यांचे "धाजीन" आजच सुरू करा.
"धाजीन" घेतल्यानें बाळंतपणानंतर येणारी अशक्तता जाऊन दुधाचा पुरवठा वाढतो आणि ह्या औषधानें सर्व साधारण विकार पण दूर होतात.





# धाजीन
(रजिस्टर्ड) स्त्रियांचे विकारांवर

अनाथ औषधालय खामगांव (महाराष्ट्र राज्य)







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# सोत्कंठ वैकुंठ



— राजा बढे

### पंचम सर्ग

'जा त्वर दूतिके घेऊनि येई तिला'
'मी इथें थांबतो' सांगतसे दूतिला
हरि वेतसकुंजी तुजसाठी थांबला
घेऊन निघे ती निरोप ओथंबला
जाहली वियोगें प्रियास जी पारखी
राधेस रमणसंवाद सांगते सखी.

**( प्रबंध १० वा** वराडी राग, रूपक ताल )

तुजसाठी, सखि राधे झुरतो गे वनमाली
करि अनंग हृदयभंग
मलयपवन देई संग
चंद्रकिरण होति शूळ, मरण ये कपाळीं ॥ १ ॥
तरुवेढित पुष्पलता
वाढविती हृदयव्यथा
कुसुमगंध करित निकर बहर जीव जाळी ॥ २ ॥
उरि लागे मदनबाण
कासाविस होति प्राण
वैजयंति माळ गळा आसवांत न्हाली ॥ ३ ॥
विव्हळतो हाय हाय
रडतो गे धाय धाय
येति हुंदके फुलून प्रेमघाव घाली ॥ ४ ॥
थरथरत्या अंगुलिनीं
घेई कान झांकोनी
मधुपांचा गुंजारव करित गे कल्हाळी ॥ ५ ॥
येतसे भरून ऊर
साहवे न विरह क्रूर
लोळतसे धरणीवर व्यथित साद घाली ॥ ६ ॥
ऐकुनियां कोकिलरव
होई गे तव आठव
'हे राधे हे राधे' फिरत भोवतालीं ॥ ७ ॥
सोडुनिया सदनिं वास
राधा वैशाखमास
भोगित वनिं विजनवास, आस ही निमाली ॥ ८ ॥
कविवर जयदेव गात
राधेचे विरहगीत
होई मन कृष्ण लीन धन्य भाग्यशाली ॥ ९ ॥

**( प्रबंध १० वा समाप्त )**

—*—

तें संकेत निकुंज मन्मथ महातीर्थी वसे माधव
झाला साधक सिद्ध मंत्र जपतां आलापि राधास्तव
ध्यानीं ये कुचकुंभ निर्भर परीरंभामृता वांछिता
पूर्वीच्याच स्थलीं पुन्हा प्रियसखे त्या वाट पाही भता



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

**प्रबंध ११ वा.**

जा नितंबिनी अविलंबे
प्रिय राधे कामकदंबे ॥ धृ ॥

कुंजवनांतरि यमुनातीरीं झुळझुळ वाहत वारा
तियेच बैसे ग वनमाली आठवि रतिसुखसारा
ग अनुसर कथं कथंबे ॥ १ ॥

करुनि साजश्रृंगार नेसुनी निळा रेशमी शेला
जाइ बाइ ग उशीर होई एकांती अलबेला
हे विचलित कांचन कुंभे ॥ २ ॥

कुचयुग चुरिती चंचल करयुग, सघन गोपयुवतींचे
थरथरते मृदु काय, थरकती जघन नव्या नवतीचे
वरि उसळति कवळी लिंबे ॥ ३ ॥

आळवीत तव नांव राधिके, वाजवि मंजुल पावा
संकेतानें तुला बोलवी, रव वायूवरि यावा
प्रीति ही मनीं ओथंबे ॥ ४ ॥

तरुवर उडती स्वैर पांखरें, पडे पानपाचोळा
येता चाहुल भास होतसे आलिस तूं लडिवाळा
हालती तुझी प्रतिबिंबे ॥ ५ ॥

फुला फुलांची रचिली शय्या परिमल गुंफित जाळे
तुला बघाया सखे लागले वाटेवरती डोळे
तुजवरती जीव विसंबे ॥ ६ ॥

कटिरशना ती पायिं पैंजणें नकोच असल्या वेळीं
चहाड या वैरिणी सांगती पोसवल्या ग केली
कर्पूर गौर रतिरंभे ॥ ७ ॥

नीट घेइ गे निळी ओढणी, दिसूं न येइल कोणा
निबिड निकुंजीं अंधारीं तो निळावंतिचा राणा
चंद्राची चुंबन बिंबे ॥ ८ ॥

गळा मोतिया हार शोभतो गगनीं बलाकमाला
गौरांगी आलिंगनिं दिसशी विजेपरी घननीळा
भुजांतरि झळकसि परिरंभे ॥ ९ ॥

फेडुनि वसना अंगभूषणा कर जघनावरि घ्यावे
सुमशयनावरि पंकजनयने हरिरतिसुख भोगावे
विरता सुरतरंग भंगे ॥ १० ॥

भारिच बाई हरि अभिमानी सरत चालली रजनी
झर झर जाई अतां राधिके पुरवि कामना रमुनी
शाम तुजसाठीं खोळंबे ॥ ११ ॥

श्री जयदेव रचित नितमंगल भावललित हे छंद
प्रसन्न हृदयें हरिप्रणयातें, गाइ गीत गोविंद
सुखतरंगसिंधु उचंबे ॥ १२ ॥

**( प्रबंध ११ समाप्त )**

वळुनि वळुनि पाहतो भिरभिरा, सोडित दीर्घ उसासे
लतानिकुंजी जाई येई मनांत चिंतित भासे
पुनः पुन्हा रतिशय्या सजवी, वाटेवरती डोळे
कामविकल हरि करि हे चाळे तुजसाठीं लडिवाळे.

पुरे पुरे बाई राधिके पुरे अता मात
सांजवेळ झाली लागली पहा सांजवात
रवीचा रथ हा निघाला बघ मावळतीला
कृष्णमनोरथही गडे ग जातिल विलयाला
लांबल्या छाया बाई ग होइल ना रात
जाशिल भेटाया कशी ग या अंधारांत
मयूरापरि मी विनवाया तुजला
फोडिते टाहो राधिके कंठ कीं ग सुकला
ऊठ ऊठ बाई घडी ही दवडुं नको वेडे
भेट जिवलगातें कशाला हे आढेवेढे
नको वेळ लावूं मनाचे उघडी दरवाजे
जा उडुनी मैने राधिके ऐक गडे माझे

* * * *

कशी रात फसविते अंधारीं कामुका
कुंजांत कळेना काळोखांतील चुका
कधिं अंधारामधिं आलिंगन देउनी
कुचयुगें मर्दुनी अधरातें चुंबुनी
कुजबुजत बोलती नीवीमोक्ष साधुनी
परि गुपित उघडता– कारभार हा मुका
तो नव्हेच वल्लभ ती नच अभिसारिका
भलतेच युगुले छळविते रात ही अशी
शंतनू-मेनका पाराशर उर्वशी
कळतो ना कांटा तमांत रुतला कुशीं
ओळखी नीट तो चोर कोण नेमका
सावध ग राधे– भान नसे कामुका





**नवमहाराष्ट्र निर्मितीचा आनंद शतगुणीत करण्यासाठीं, वार्षिकांची परंपरा निर्माण करणारें रसिक महाराष्ट्राचें एकमेव—**

वर्ष १६ वें **दी पा व ली** वार्षिक १९६०

**ऐन दिवाळीत प्रसिद्ध होत आहे.**

- १२ ऑफसेट पद्धतीनें छापलेल्या विलोभनीय कलाकृति.
- अद्यावत् असें नयनरम्य मुखपृष्ठ.
- दीपावलीच्या परंपरेला शोभणारें, जेष्ठ व श्रेष्ठ लेखकांचे अक्षर वाङ्मय व प्रतिवार्षिक नाविन्यपूर्ण तशीच मिष्कील लेखमाला.
- अनेक नवीन सदरे, व्यंगचित्रें, दिंगचित्रें, रेखाचित्रें, पानपूरकें.
- हिन्दी दीपावली आपल्या वैशिष्ट्याने नेहमीप्रमाणें प्रकाशित होत आहे

किंमत रु. ३ + १ र. पो.

**दलाल आर्ट स्टुडियो, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई-४.**


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

भयचकिता लपत छपत तिमिरांतुनि जाता
थबकत तरुतळि थकतां
अंधारी पथ चुकतां
भेट गडे प्रियकरास, जाइ सखे आता
मन्मथमथ गति मंथर
मंद मंद पद सुंदर
वाटतसे तुज बघुनी चंद्र येई हातां

*        *        *

राधा मुखारविंदाभवती मिलिंद घालित रुंजी
त्रिलोकसुंदर वृंदावन हे कुंजनीलिमा पुंजी
व्रजसुंदरीच्या हृदयानंदा पुरवी लीला रमणा
कंसध्वंसना देवकीनंदन धूमकेतु हा जाणा

+        +

'साकांक्ष पुंडरिकाक्ष
पंचमसर्ग समाप्त

*        *

**सर्ग सहावा**

**सोत्कंठ वैकुंठ**

(वृत्त-मालिनी)

निरखित वनकुंजीं आकुला चारुशीला
सहृदय सखि सांगे येउनी माधवाला
तुजवरि अनुरक्ता राधिका शक्तिहीना
अविरत विरहार्त्ता चिंतनीं मग्न दीना
विचलित तनुकंपा चालतां तोल जाई
बघुनिच अनुकंपा अंतरीं येत पाही
अवनत मुखकलांता मूर्छिता प्रीतिबंधा
विकल मदनमंदा जाहली रे मुकुंदा

(**प्रबंध १२** राग गुणकली, ताल रूपक)

नाथ हरे यदुनाथ हरे, राधा कुंजवनीं विचरे
पाहत दिशिं दिशिं तुजसि मुकुंदा
बिंबाधर मधु चुंबी मिलिंदा ॥ ध्रु ॥

मदनोन्मादें ती मदयंती
उचलताच पद भोवळ येती
तंद्री नच उतरे। राधा कुंजवनीं विचरे ॥ १ ॥

करकिसलय मृदु मृणाल कंकण
जीवित रतिलालस परिरंभण
आस मनांत उरे ॥ राधा ॥ ॥ २ ॥

स्वयेंच होई कृष्ण शामला
रमते करुनी अभिनय लीला
भावसंगमीं विहरे ॥ राधा ॥ ३ ॥

(पान ५८ वर चालू)

दर्जेदार मासिक म्हणून आपला लौकिक कायम ठेवणाऱ्या



आक्टोबर ६० च्या अंकांत

- जुन्या श्रेष्ठ कथाकारांच्या कथांबरोबरच नवोदितांच्या रम्य आणि लोभस कथा.
- राजा बढे यांच्या 'श्रृंगार-श्रीरंग' या रम्य काव्याचा पुढील अतिरम्य सर्ग.
- शेरलॉक होम्सच्या बेकर स्ट्रीटवर त्याच्याच शेजारी आणि त्याचवेळीं घडलेली पण तीक्ष्ण नजरेच्या शेरलॉक होम्सला माहितहि नसलेली एक मनोज्ञ रहस्यमय सत्यकथा.
- छान छान कविता.
- नेहमीची लोकप्रिय सदरे, आणि
- सुरस सुंदर रंगीत मुखपृष्ठ. * व्यंगचित्रें - हास्यचित्रें—विंगचित्रें वगैरे.
- तसेंच भारताचे भाग्यविधाते या मालेंतील ६ वी रंगीत भेट.

★ आणि या पुढचा अंक म्हणजे **दीपावली** चा वार्षिक खास अंक ★

सर्व खास अंकांसह वार्षिक वर्गणी रु. १२–५०

दलाल आर्ट स्टुडियो, ४२, कॅनेडी ब्रीज, मुंबई ४.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



“ स्त्रीनें केलेलें पुरुषावरील प्रेम ती कदापि विसरूं शकत नाहीं. तीं त्यांत चिरंतन विसांवा घेऊं पाहाते; पण अशा सुखाला आंचवलेली एखादी स्त्री वंचिता ठरते ! तूं जें कांहीं मिळवलं आहेस त्यापेक्षां तें कांहीं तरी फार मोलाचं गमावून बसली आहेस. फार मोलाचं ! ? ”

प्रभावती ! आज आपण किती दुरावलों आहोंत ! नियतीच्या दुष्ट चक्रानें आपल्याला आजच्या घटकेला इतकं दूर भिरकावलं आहे कीं, फिरून कधीं आपण जवळ येण्याची शक्यताच उरलेली नाहीं. निदान या चालू आयुष्यांत तरी. जवळ येणंच कशाला ! आयुष्याची चढण चढतांना, गतकाळांतील रम्यतेनें मनांत विलक्षण हुरहूर निर्माण होऊन, त्या चढणीवरून मागें वळून एकमेकांकडे भरलेल्या डोळ्यांनीं नुसतं पाहणें तरी शक्य आहे कां आज ? गतस्मृतींचीं पानें चाळतां चाळतां एकांतांत गळा दाटून यावा, विस्मरीत प्रसंगांभोंवती पुन्हां पिंगा घालावा, झरझरणाऱ्या डोळ्यांनीं तीं अंधुक दृश्यें पुन्हां आपलीशीं करावींत, असं होणं आणि असं वाटणं तरी शक्य आहे कां आज ? प्रभा, हें सारं असंच आहे बघ ! सारं अपरिहार्य आहे ! आपलीं मनें आतां इतकीं कोरीं झालींत कीं, कधींकाळीं तिथं कांहीं उमटलं होतें कीं नाहीं याची भ्रांत पडावी ! रितेपणाच्या सोबतीची त्याला आज इतकी संवय झाली आहे कीं, कधींमधीं त्याच्या निळ्या अवकाशांत अवचित् असं वादळ उठेल, डोळ्यांत वळीवाचा पाऊस खळखळेल यांची आतां शक्यताच उरलेली नाहीं. उरलेला मृद्गंधसुद्धां आतां आपल्याला येनां येणार नाहीं. डोक्यांत माती घालून केलेला आक्रोशसुद्धां आतां आपल्याला या भूचक्राच्या घरघरींत ऐकूं येणार नाहीं. त्या वेगवान् चक्रानें फार फार दूर केलंय् आपल्याला !

हें सारं आपल्याला अशक्य आहे. निदान तुला तरी. कारण तूं आतां नवपरिणत राहिलेली नाहींस. तुझा थिल्लरपणा संपलाय्. तुझ्यांतील तूं आतां नाहींशी झाली आहेस. कुणासाठीं तरी तुझं आयुष्य कारणीं पडतंय्. प्रभावती, तूं आतां गृहिणी झाली आहेस. तुला आतां स्त्रीत्व प्राप्त झालंय्. तुझ्या नवऱ्याचं पौरुषत्व सिद्ध होण्याइतकं स्त्रीत्व तुला मिळालं आहे. मी तर काय पुरुष आहे. आणि आतां तर एक परपुरुष आहे. आणि म्हणूनच कधींतरी एकांतांत गतआठवणींशीं गोष्टीं करणेंहि तुला आतां केवळ अशक्य आहे. स्मृतींच्या पडछायाहि आतां जळून गेल्या आहेत. हा संघर्ष अनादि आहे कदाचित् तो अनंतहि असूं शकेल.

घडलं तें अघटित घडलं नाहीं. अकल्पित घडलं नाहीं. अतर्क्य तर मुळींच नव्हतं. झालं तें फक्त आकस्मिक्. रंगीबेरंगी फुलाफुलांतून नुकतीं कुठं आपलीं स्वप्नं उमलूं लागलीं होतीं. आणि त्या स्वप्नांत नुकते कुठें आपण रंग भरूं लागलों होतों. तेवढ्यांत त्या चक्रानें गति घेतली. इतक्या तरल आणि इतक्या नाजूक संबंधानंतर, तुझं लग्न एका परपुरुषाशीं होऊं घातलें होतें. गोष्ट वाईट होत





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट
अनुक्रमणिका

होती, पण ती तशीच होणं अपरिहार्य होतं. आपल्या दोघां-नाहि ती पटत होती. विशेषतः मला ती पटली होती. कारण लौकिक जगांत मी एक अयशस्वी गृहस्थ ठरलों होतों. आणि निर्धनाच्या शब्दाला त्या जगांत किंमत येत नसते. तुझं लग्न दुसऱ्याशींच होणं अधिक योग्य आहे हें मला मनोमन पटत होतें. आणि मला पटण्या न पटण्यावर ती गोष्ट थांबणार होती काय ? मी जळफळलों, तळमळलों. तूं जीवाच्या आकांतानें माझ्यापाशीं आक्रोश केलास, नशिबाला बोल लाविलेस आणि अखेर एका मिळवत्या सद्‌गृहस्थाशीं विवाहबद्ध झालीस. आपल्या स्वप्नांच्या आशा आकांक्षांच्या, वचनांच्या कलेवरावर तूं वेदीचं पवित्र सोंहलं मांडलंस आणि माझ्या प्रेतवत् शरीरावर पाय ठेवून तूं तुझ्या देवाला हार घातलास !

प्रभा, झालं हें असं झालं. आणि तेंहि आकस्मिक. प्रेमाच्या वैफल्याची ही कहाणी आपल्याच विषयांत कांहीं नवीन घडली नव्हती. तो प्रेमाचा इतिहास होता. त्याची फक्त पुनरावृत्ती झाली होती. आणि तुझें लग्न होणें तर आवश्यक नव्हतं काय ? तूं वयांत आली होतीस आणि तुझी आई वृद्ध झाली होती. तिच्या डोळ्यांदेखत हें मंगल कार्य व्हावें असं तुझ्या घरांतील सर्वच लोकांना पटलें होतें. आणि या एकाच दिशेनें ते पाऊलें टाकीत राहिले. मी हातपाय

# प रा जि ता

## प द्मा क र   गो व ई क र

असून पंगू ठरलों होतों. तूं तर बोलून चालून एक मुलगी. लग्न म्हणजे दोन अनावृत्त शरीराचा व्यापार असें असें समजणाऱ्या तुझ्या घरांतील लोकांनीं तुझ्या मनाचा विचार करण्याचें कारणच नव्हतें !

दोघांचीं आयुष्यें पुन्हां समांतर झाली. झालेल्या घटनांकडे मी तिऱ्हाईतासारखा पाहूं शकत होतों. अगदीं परकेपणानें मी तें सारें सहन करूं शकत होतों. काळालाहि पंख असतात याची मला जाण होती. मी वाटचाल करूं लागलो. प्रश्न फक्त तुझा होता. तुझ्या माझ्यावरील अपार प्रेमाचा होता. उर्वरीत आयुष्य तुला एका अनोळखी इसमाबरोबर घालवायचें होतें. कारण त्या मोबदल्यांत तुला तो पोटाला खायला देणार होता आणि ल्यायला अंगवस्त्रें देणार होता.

प्रभावती, आपल्या सहवासांतील घटनांचा मला केवळ तपशील द्यायचा नाहीं. झालेल्या घटनांची स्मृति उगाळत मी कालपर्यंत वाटचाल करीत आलों. कालपर्यंत आपली वितळलेलीं सोनेरी स्वप्नं मी पुनः पुन्हां शोधीत राहिलों. अगदीं कालपर्यंत तुझ्या आठवणींच्या पागोळ्यांची संगत घेऊन मी माझ्या मनाचा टाव घेत राहिलों. उरांत रुतलेलें तुझेंपण हुडकीत आलों पण आज......

आज तुझ्या विषयांतील स्मृतींना मी माझ्या हातांनीं अग्नी दिला आहे. आणि त्याच्या दिव्य प्रकाशांत माझं मन (माझं 'द्वेषी मन' असं तूं म्हणालीस) विकट हावभाव करीत आहे. ज्वाला अंतराळांत जाऊन भिडताहेत. त्याच जुन्या चक्राला पुन्हां गति मिळाली आहे. तुझ्यापासून किती तरी योजनें मी पुन्हां दूर आलोंय् !

असें होण्याचें कारण ? कारण आजची आपली भेट. प्रभा, माझं तुझ्यावर संपूर्ण सात्विक प्रेम मुळींच नव्हतें, संपूर्ण सात्विक प्रेम कुणींच करूं शकत नाहीं. तसं असेल तर तें एकांगी असेल. अर्थात् माझं तुझ्यावर संपूर्ण शारीरिक प्रेमहि नव्हतं. पण शारीरिक ओढीला मी मुकलों नव्हतों. वारंवार भेटी आणि सहवास यामुळें ती अनिवार ओढ अभावितपणें माझ्यांत प्रवेश करीत होती. आणि प्रभा, आपल्या प्रेमसंबंधांत शारीरिक ओढ तुलाहि होती. माझं हें विधान ऐकून तूं दचकशील. माझा तिरस्कार करशील. पण प्रभा, हें खरें आहे. तुला शारीरिक ओढ होती. तुला नव्हतं तें फक्त लैंगिक आकर्षण. प्रभावती, यांतील फरक तूं लक्षांत घे. तशा प्रकारचीं वचनें तूंच मला ऐकविली होतीस !

आणि आजच्या घटकेला तूं तेंहि चुकवूं शकली नव्हतीस. तेंहि आकर्षण तुला आज प्रकर्षानें जाणवूं लागलें होतें. पंचमुखीं सुरवरांच्या साक्षीनें विवाहबद्ध झालेल्या पतिपत्नींनीहि तशा प्रकारच्या किळसवाण्या गोष्टी करूं नयेत असं तुझं मत होतं. स्त्रीत्वाच्या तुझ्या कल्पना मुळांतच या आणि अशा कांहींशा होत्या. विस्मयाची गोष्ट होती. ज्यासाठीं पुराणकाळांतील देवादिकांपासून कलह चालू होते, ज्यासाठीं थोर थोर साधकांनीं आपली तपःसाधना मातींत मिळविली होती त्या अपराजित शक्तीवर तूं एक विसाव्या शतकांतील पोर विजय मिळविणार होतीस ! त्याच विजिगीषेनें तूं तुझ्या नव्या विश्वांत सात पाऊलें चालून गेली होतीस. आणि सारा डाव तुझ्या-वर उलटला होता !

स्त्रीनें केलेलं पुरुषावरील प्रेम ती कदापि विसरूं शकत नाहीं. ती त्यांत चिरंतन विसांवा घेऊं पाहते; पण अशा सुखाला आंचवलेली एखादी स्त्री वंचिता ठरते ! कालपर्यंत माझ्या मनांत तूं वंचिता होतीस, पण आज तूं केवळ वंचिता उरली नाहींस. आज तूं एक पराजिता झाली आहेस. त्या आकर्षणाच्या कक्षेत आज गिरक्या खात आहेस. तुझ्या त्या विजिगीषेच्या ध्वजपताका आज मोडून पडल्या आहेत, कोसळून गेल्या आहेत. निशाणहीन झालेल्या हत्तीसारखं तुझें वेडे मन आज पिसाट होऊन सैरावैरा धांवत आहे. तुझ्यापासून तें अलग होऊं पाहते आहे. एका अनामिक भीतीनें तें तुझ्यापासून दूर पळत आहे. आजच्या तुझ्या नजरेत हें सारे तरंग मी पाहिले आहेत. आणखीहि कांहीं मी पाहिलें. तुझ्या विजयाच्या ध्वजपताका तर मोडून पडल्याच होत्या, पण तिथं नवीन कांहींतरी निशाण झळकत होतें. तुला जिंकल्याचें तें निशाण होतें. तुझ्या शरीरावर सर्पासारखी लोळण घेणाऱ्या तुझ्या नवऱ्यानें







अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तिथं आपल्या विजयाची पताका झळकविली होती. साधनेवर वासनेनं जय मिळविला होता. आज तूं संपूर्ण पराजित झाली आहेस. आणि एका अर्थानें तो माझाहि पराभव आहे.

होय. प्रभा, मीहि एका अर्थानें पराजित झालों आहे. त्या अंतिम क्षणीं, त्या अखेरच्या क्षणीं मीं त्या इच्छांवर जो विजय मिळविला होता त्याचं काय झालें ? तुझ्या तीव्र प्रतिकारानें मीं तो क्षण जिंकला होता. तुझ्या तीव्र प्रतिकारामुळें असेल, पण मीं तो जिंकला होता. मीं मनांत आणलं असतं तर तुझ्या तीव्र प्रतिकाराचाहि प्रतिकार मी करूं शकत नव्हतो काय ? तो दिव्य क्षण आज तूं मातींत लोळविला आहेस. असीम यातनांनीं जिंकलेल्या क्षणाच्या त्या आनंद समाधीवर तूं आज प्रहार केले आहेस. त्यावेळीं तूं माझ्यावर प्रहार केलेस. आज तूं त्या क्षणावरहि प्रहार केलेस. पतिपत्नींच्या नात्यांत हें सारं असंभाव्य नव्हतं हें मला पटत होतें. अगदीं मनोमन पटलं होतं, पण तें मला मानवत नव्हतं. आपलं प्रेम म्हणजे निसर्गाचा एक क्षणिक उत्पात होता काय ? कीं, जो आतां टळून गेला आहे ! आणि शिवाय उच्चरवानीं केलेल्या तुझ्या त्या प्रतिज्ञेचं काय झालं ? ज्या अखेरच्या क्षणीं तूं मला जो तीव्र प्रतिकार केलास तोच प्रतिकार तूं तुझ्या पतीशीं कां करूं शकली नाहींस ? ज्या प्रतिकारामुळें मीं तो तेजस्वी क्षण जिंकूं शकलों, त्या किळसवाण्या क्षणाला तूं कशी बळी पडलीस ? ज्या थरथरत्या क्षणानें मला तुझ्यांतील अलौकिकत्व दाखविलें होतें, तुझ्यांतील वेगळेपण दाखविलें आणि मला थक्क करून सोडलें होतें तोच क्षण तूं उपभोगलास ? अगदीं मिटक्या मारीत उपभोगलास ? प्रभा, तूंच केलेंस कां हें ? काय केलेस हें ? देवता म्हणून मानलेल्या मूर्तीनें आपल्यांतलें अशनीत्व दाखवावें, तसं तूं केलेंस ! माझ्या मनः पटलावर कोरलेली तुझी आगळी मूर्ति तूं फोडलीस ! तूं तिच्यावर घांव घातलेंस ! तूं ती मूर्ति भंगविलीस ! तूं तुझ्याच मूर्तीवर प्रहार केलेंस !

इथंच मीहि पराजित झालों. आदर्श म्हणून मानलेल्या व्यक्तीचा पराभव हा मनुष्याच्या जीवनांतला सर्वांत मोठा पराभव आहे. आणि तोहि त्या आदर्श व्यक्तीच्या भोग लालसेनेंच झाला असेल तर त्याच्या इतकी अपरिमित चीडहि दुर्मिळ असते. अटळ असते. किंबहुना ती आवश्यकच असते. म्हणूनच तुझ्या स्मृतींच्या विषयांतील उत्तरदायित्व मीं आज करून टाकलें आहे.

उत्कृष्ट व्यक्तिमत्व कांहीं तरी नवनवोन्मेष निर्मिति करीत असते. कांहीं गमावून बसत नसते. तूंहि कांहीं 'निर्मिति' केली आहेस, पण प्रभा, या निर्मितीपासून तूं जें कांहीं मिळविलें आहेस त्यापेक्षां त्यापासून तूं कांहीं तरी फार मोलाचं गमावून बसली आहेस. फार मोलाचं. एका अलौकिक प्रतिज्ञेची लालूच दाखवून ज्या क्षणापासून तूं स्वतःची सोडवणूक करून घेऊन माझा अधःपात टाळला होतास त्या उत्कट क्षणाची मी तुला आठवण करून द्यावी काय ?



मैत्रिणींच्याबरोबर सहलीला म्हणून तूं महाबळेश्वरला निघालीस. आणि खरोखरंच तुझ्याबरोबर मैत्रिणी होत्या. फक्त तुला त्यांचं सहाय्य होतें. आणि त्याच गाडींतल्या एका खिडकीशीं मीहि बसलों होतों. त्या तीन-चार तासांच्या प्रवासांत तुम्ही मुलींनीं गाडी अगदीं डोक्यावर घेतली होती. गप्पाविनोदानं तुम्ही गाडींत अगदीं मोकळेपणानें बडबडत होतां, हंसत होता, प्रसंगी गिल्लाहि करीत होता. मोटारींतील प्रत्येक सहप्रवासी थोड्याफार प्रमाणांत तुमच्यावर विथरला होता. पण मोटारीच्याहि दुप्पट गतीनें तुमचीं तोंडं चाललीं होतीं. तुझ्या मैत्रिणींनीं तुला वेढिली होती. त्यांच्या चेष्टेचा विषय तूं होतीस. मला ऐकूं जाईल अशा आवाजांत आणि मला (च) कळेल अशा शब्दांत त्या तुझी चेष्टा करीत होत्या. आणि तूं लाजेनं गोरामोरा झालेला चेहेरा कुठंतरी लपविण्याचा निष्फल प्रयत्न करीत होतीस. अगदीं मोटारींतून उतरल्यानंतरहि, "Wish you dreamy night..." म्हणून तुझ्या सख्यांनीं तुझा निरोप घेतला. त्रावी प्रधान तर मला ऐकूं येईल अशा स्वरांत ओरडली—"प्रभे, मी आजपासून दुपटी शिवायला शिकणार आहे ग !"

हंसत, खिदळत, त्या दूरवर निघून गेल्या. तूं माझ्याकडे आलीस. माझ्या हातांतील कातडी पेटी तूं तुझ्या हातांत घेतलीस. आपण चालूं लागलों.

तो सारा दिवस आपण भटकण्यांत घालविला. हिरव्या हिरव्या झाडींतून, तांबड्या लाल मातींतून, निळ्या नितळ आकाशाखालीं आपण एका धुंदींत भटकत राहिलों. उंच उंच कडेकपारींतून एकमेकांना बिलगून चालतांना कसलीशी वेहोषी आपल्या नसनसांत चढत होती. उंच उंच आभाळांत आपलीं इवलालीं मनें झेंपावत होतीं. भावी सुखाची सोनेरी नगरी आपण आभाळाच्या निळ्या रंगावर पहात राहिलों. निसर्गाची भव्य विशालता आपण आपल्या अंतःकरणांत समावूं पाहात होतों. जुन्या महाबळेश्वरांतील डोंगरांतील शिवालयीं घंटानादांत आपण भान हरपलों. माझ्या बळकट बाहूंवर तूं कधीं विसांवत होतीस तर कधीं माझ्या विशाल वक्षावर रेलत होतीस. डोंगरमाथ्यावर तरंगणाऱ्या धुक्यासारखें आपण साऱ्या महाबळेश्वरावर तरंगत होतों. आणि तसेंच कुठंतरी विरून जावेंसें वाटत होतें. निळ्याशार जलाशयांत उभे राहून आपण क्षितिजावर रेंगाळणाऱ्या तांबड्यालाल सूर्याचा निरोप घेतला. आणि उन्मादाची एकच झिंग घेऊन आपण हॉटेलकडे कातरवेळीं परतलों !...

त्याच भारावलेल्या अवस्थेंत आपण जेवण केलें. आणि राखून ठेवलेल्या आपल्या प्रशस्त खोलींत आपण आलों. कपडे बदलून मीं पलंगावर अंग टाकलें होतें. कसल्याशा गुंगीनें मी स्वतःला हरवून



अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

असें म्हणतात कीं, तेराव्या शतकांतील सुप्रसिद्ध कोनारक मंदिर बांधण्यासाठीं जवळजवळ १२ वर्षेंपर्यंत १२०० कसबी कामगार सतत खपत होते.

कोणत्याहि दृष्टीनें निर्णय केला तरी अशा प्रकारची प्रचंड इमारत बांधणें म्हणजे एक अवाढव्य कामगिरीच होती. तसेंच बांधकामाच्या सामुग्रीची मागणी वाढल्यामुळे आणि त्याचबरोबर एवढ्या मोठ्या कामगारांच्या संख्येला लागणाऱ्या दैनंदिन वस्तूंची मागणीहि वाढल्यामुळे त्यावेळीं अनेक लहानमोठ्या उद्योगधंद्यांच्या वाढीस चालना मिळाली असेल याचीहि सहज कल्पना करता येते.



पूर्वीप्रमाणेंच आजहि, मोठ्या संघटनेच्या व्यापांतून पुष्कळशा चालू उद्योगधंद्यांना उत्तेजन मिळतें आणि शिवाय नवीन उद्योगधंदेहि निर्माण होऊन त्यायोगें आर्थिक क्षेत्रांत सतत प्रगति होत राहते. स्टॅंडर्ड व्हॅक्यूमचें तर ठाम धोरणच आहे कीं कंपनीच्या व्यवहारांत लागणारी गरजू-सामुग्री शक्य तितक्या जास्त प्रमाणांत स्थानिक व्यापारी संस्थांकडे उपलब्ध असलेलीच वापरावयाची. त्यानुसार, १९५९ सालीं अशा सामुग्रीची भारतांत केलेली खरेदी ३ कोटि ४६ लक्ष रुपये एवढी झाली. यांतील २ कोटी ८९ लक्ष रुपये खरेदी-विक्रीच्या संघटनेसाठीं व ४२ लक्ष रुपये तेलशुद्धीकरणासाठीं लागणाऱ्या गरजू सामुग्रीवर खर्च झाले. १९५५ ते १९५९ या काळांतील पांच वर्षांत स्टॅंडर्ड व्हॅक्यूमच्या तिन्ही शाखांच्या गरजा पुऱ्या करण्यासाठीं एकूण १६ कोटी ५९ लक्ष रुपये लागले. स्टॅनव्हॅक संस्थेच्या व्यवहारांतून प्रत्यक्ष निर्माण झालेल्या गरजा पुऱ्या करण्यासाठीं जे नवनवीन उद्योगधंदे भारतांत निघाले त्यांत अॅस्फाल्ट (डाम्बर) व खनिज तेलें यासाठीं लागणारी लहानमोठ पिंपें, गॅसोलीनचे पंप आणि आधुनिक प्रकारच्या तेल-टाक्या बसविलेल्या मालवाहू मोटारी (ट्रक्स) व विमानांसाठीं लागणारे रीफ्युएलर्स तयार करणें वगैरे व्यवसायांचा समावेश होतो.



**स्टॅनव्हॅक** – भारताच्या प्रगतींत सहभागी आहे.

स्टॅंडर्ड व्हॅक्यूम ऑईल कंपनी–मर्यादित जबाबदारीवर यू. एस. ए. मध्यें संस्थापित.

PSSVOC-11AMO-MAR








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

बसलों होतों. आणि खिडकिशीं उभी राहून, माझ्याकडे पाठ करून तूं कपडे बदलत होतीस. दोन दातांत पदर धरून तूं तुझें पोलकें बदलत होतीस. तुझ्या त्या पाठमोऱ्या आकृतीकडे मी गिधाडाच्या नजरेनें पाहात होतों. नको असलेले रंग माझ्या डोळ्यांत चढत होते. तुझ्या मोहक हालचालींनीं मी आंतल्या आंत धुमसूं लागलों होतों. तो अदृश्य क्षण माझ्या पलंगाभोंवती हलक्या पाऊलांनी रेंगाळत होता. कुठल्यातरी क्षीण क्षणीं तो माझ्यावर झडप घालणार होता. आणि नंतर मी तुझ्यावर......!

माझ्याकडें पाहून तूं एकदां हंसलीस. दातांत धरलेला पदर अंगाभोंवती फिरवून तूं तो डाव्या खांद्यावर घेतलास आणि माझ्याकडे आलीस. मी अर्धवट पिऊन ठेवलेला उशालगतचा ग्लास तूं उचललास आणि आपल्या नाजूक ओठांत रुतविलास. दोनच घोंट तूं पाणी प्यायलीस. माझ्याकडे पाहून पुन्हां एकहां हंसलीस आणि अंगाला अंग लावून तूं माझ्या अगदीं शेजारीं येऊन झोंपलीस.

हा वेळपर्यंत माझं रक्त अगदीं तापून तापून निघालें होतें. आंतल्या आंत तें उकळूं लागले होतें. आणि तुला शोषून टाकण्याच्या एकाच ईर्ष्येनें मी तुझ्या ओठांवर पुनः पुन्हां डंख मारूं लागलों. अगदीं थोडक्यांच अवकाशांत मी तुझ्या ओठांची नुसती चाळण करून टाकली होती. तूंहि स्त्रीसुलभ मर्यादेनें माझ्या गालाचीं, कपाळाचीं चुंबनें घेत होतीस. चुंबनांनी माणसाला कैफ चढतो. मीहि कैफाच्या एका अत्युच्च कड्यावर जात होतों. तुझ्या अंगाभोंवतीची माझी मिठी अधिक घट्ट होत होती. मस्तकापासून तळपाऊलापर्यंतच्या साऱ्या धमन्यांतील माझें रक्त एकाच दिशेनें वाहात होतें. एकाच वेगानें वाहात होतें. वासनांचें एक मोहोळच्या मोहोळ माझ्या डोक्यांत उठलें होतें. त्यांतील त्या तांबड्यालाल माशा माझे लचके तोडीत होत्या. खून चढलेल्या माझ्या डोळ्यांना फक्त मधलं ठेवकणारें मधाचें पोळें दिसत होतें. आणि दुसऱ्याच क्षणीं मीं माझा केंसाळ पाय तुझ्या अंगावर टाकला......

आणि मग तुझी हालचाल चालू झाली. डोळे विस्फारून तूं माझ्याकडे पाहूं लागलीस. मला दूर लोटूं लागलीस. माझ्या घट्ट मिठींतून तूं निसटूं लागलीस. माझ्याशीं झोंबूं लागलीस. एका वेगळ्याच सामर्थ्यानें तूं माझ्याशीं प्रतिकार करूं लागलीस. तुझ्यावरची माझी पकड अधिकच घट्ट होत होती. अगदीं अखेरच्या क्षणीं तुझा प्रतिकार मला मान्य नव्हता. भेदरलेल्या स्वरांत तूं मला म्हणत होतीस,—"राजन् काय हें ? स्वतःला आवर, राजन्, स्वतःला आवर..." अन्...

दुसऱ्याचक्षणीं तो दिव्य क्षण स्वतःशींच गडगडून हंसला आणि लागोपाठ त्यानें माझ्यावर प्रहारामागून प्रहार केले. उशागतीचा पाण्याचा ग्लास तूं त्वेषानें उचललास आणि माझ्या कपाळावर त्याचे प्रहार केलेस. एक...दोन ..तीन...ग्लास फुटला. कांचा खळखळल्या माझ्या डोळ्यांपुढें रंगी बेरंगी ठिणग्या चमकून गेल्या. आणि मग खून चढलेलं माझं रक्त कपाळांतून भळभळां वाहूं लागलें. मधांच्या त्या तांबड्या लाल माशा अस्पष्ट घोंघावत दूरवर निघून गेल्या. रक्तस्लांत चेहऱ्यानें मी विव्हळलों. तो दिव्य क्षण माझ्या पाठीवर हात ठेवून उभा होता.

प्रभावती, आठवते ती रात्र ? किती भयानक ! किती मंगल ! आणि त्याच पहांटे तूं प्रतिज्ञा केलीस. माझं जखमी मस्तक आपल्या मांडीवर घेऊन तूं रडत होतीस. माझी जखम चोळत होतीस. अस्पष्ट स्वरांत माझी क्षमा मागत होतीस. मी डोळे मिटून शांत पडलों होतों. माझें अवसानच संपलें होतें. आणि एकाएकीं तूं बोललीस—'

"ज्या क्षणानं माझ्या राजूचं रक्त सांडलं तो क्षण...तो क्षण मी माझ्या आयुष्यांत कधीं येऊं देणार नाहीं....कधीं येऊं देणार नाहीं. राजू मला क्षमा कर...अगदीं परक्याशीं लग्न लागलं तरी मी तो क्षण येऊं देणार नाहीं. राजू, मी प्रतिज्ञा करते रे ! राजू...... राजू..."

अन् माझ्या छातीवर मस्तक ठेवून तूं मुसमुसून रडूं लागलीस. पहांटेचा गार वारा मला थंड गुंगी आणत होता. आणि काळोखाच्या स्कंधावरून येणाऱ्या मंगल घंटानादांवर मी हेलावत होतों, तरंगत होतों.

आणि प्रभा, आज तूं मला भेटलीस—भेटलीस कुठली दिसलीस—ती कुठल्या अवस्थेंत ! समर्थांच्या देवळाकडे तूं चालली होतीस आणि मी तुझ्या समोर येत होतों. माझ्याबरोबर माझे स्नेही होते. तूंहि एकटी नव्हतीस. आणि म्हणूनच भान न राहून मी तुझ्याकडे पाहात रस्त्यांतच उभा होतों. तूं समोरून चालली होतीस. माझ्या कपाळावरच्या बुजून गेलेल्या व्रणाखालची ओली जखम पुनः वाहूं

( पान १८ वर चालू )

बँकिंगच्या सर्व प्रकारच्या सोयी आणि सवलतीसाठीं
महाराष्ट्रांतील विश्वसनीय बँक
धी बॉम्बे स्टेट को-ऑपरेटिव्ह बँक लि.
मुख्य कचेरी : ९, बेक हाऊस लेन, फोर्ट, मुंबई १.
: फोन : २५१४७४-७५ | : स्थापना : १९११ | : ग्रॅम्स : फार्मरबँक
महाराष्ट्रीयांना आपणांस व्यापारी संबंध जोडण्यास मदत व्हावी म्हणून ही बँक नेहमीच आपल्या सेवेस तयार आहे.

आपल्या बँकेमार्फत याची खात्री करून घ्या !


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



पंडित कवींनीं रंगविलेली

# रासक्रीडा

शृंगार रस हा साहित्यांतील रसराज होय. पुष्कळसे वाङ्मय त्यांतील शृंगाररसाच्या रुचिर माधुरीमुळेंच अक्षरत्व पावलें आहे. तरल संवेदनाक्षम मनाचा कलाकार आणि त्याची प्रतिभा याच्या रासलीलेचा उल्लास झाल्यावर जी कला सजीव होते ती बहुधा शृंगार रसाचे मधुबिंदू पिऊनच बाळसेदार झालेली असते.

आजचें काव्य हें आत्मपर असल्यानें शृंगार भावाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म छटा रंगविणें आणि मनांत उठलेला प्रत्येक भावतरंग शब्दसाकार करणें कवींनां शक्य होतें परंतु आत्मपर काव्य निषिद्ध मानावयाची रूढी असलेल्या पूर्वसूरींच्या काळीं, नवनिर्मितीची ओढ, तींच तीं देवांची कथानकें लिहून भागविली जात असे. देव हे आदरस्थाने असल्यानें, त्यांना नवनिर्मितींचे विषय बनविल्यावर, शृंगाराचा जो प्रथमरस कविमनांत प्रतिक्षणीं कंपनें उठवी, त्याचा यथोचित सत्कार, औचित्याच्या मर्यादेंत कसा करावा हा या जुन्या कवींपुढें एक कूटप्रश्न असे. आजच्या सुदैवी आत्मपर कवींना मिळणारें स्वातंत्र्य त्यांना नव्हते. त्यामुळें कवित्वाची प्रेरणा आणि विषयाच्या मर्यादा यांच्या परस्पर विरोधी पकडींत त्यांचा कोंडमारा होत असे. या कोंडणींतून बाहेर पडण्याचा एकलाच मार्ग म्हणजे गोपी वस्त्रहरण आणि रासक्रीडा ही भागवतांतील कथानकें होत. शृंगाराला भक्तिरसाच्या घरीं पाणी भरावयास लावण्याचें सामर्थ्य असलेल्या संत कवींना रासक्रीडेच्या वाटेस जाणें अपरिहार्य झालें नाहीं. परंतु ज्यांची प्रेरणा पांडित्याची होती अशा पंडीतकवींना शृंगाररसाचा आविष्कार करण्याची तळमळ भागविण्यासाठीं रासक्रीडेकडे वळावेंच लागलें. वामन पंडित, कृष्णदयार्णव, श्रीधर आणि मोरोपंत हे कालक्रमानें रासलीला वर्णन करणाऱ्यांत प्रमुख होत. गोपी वस्त्रहरण आणि रासक्रीडा यांचा अन्योन्य संबंध आहे. कृष्ण पती मिळावा म्हणून कात्यायनी व्रत करणाऱ्या गोपींचीच वस्त्रें कृष्ण हरण करतो. आणि त्यांची कामना पुरी करण्यासाठीं त्यांच्याशीं रासक्रीडा करतो. वामनपंडितांनी हा कथाभाग कात्यायनी व्रत (१ व २) आणि रासक्रीडा यांत, कृष्णदयार्णवांनीं, हरिवरदा अध्याय २२, २९ ते ३३ यांत, श्रीधरपंडितांनीं, हरिविजय अध्याय १५ व १७ यांत आणि मोरोपंतांनी कृष्णविजय अध्याय २२ व २९ ते ३३ यांत वर्णिला आहे. या पंडितकवींनीं साधलेल्या रसोत्कर्षाचा अंशमात्र आस्वाद आपणास येथें घ्यावयाचा आहे. यापुढील प्रत्येक कल्पना ही या पंडित कवींच्या काव्यांतील असून क्रियापदाला गद्य स्वरूप देण्या पलीकडे व अगदींच अपरिचित शब्दांना परिचित अर्थ देण्यापलीकडे त्या कल्पनांत कोणताही बदल केलेला नाहीं.

**आनंद साधले**

हेमंतऋतु आला. महिना मार्गशीर्षाचा. या महिन्यांत गोपकुमारी उषःकालीं नियमनपूर्वक कात्यायनी व्रताचें आचरण करीत. अरुणानें प्राची प्रकाशित केल्यावर त्या सगळ्या यमुनेवर येऊन, वस्त्रें तटाकीं ठेऊन यमुनाजलांत स्नान करीत. मग वालुकेची शुभलक्षणी मूर्ति निर्मून, तीमध्यें सालंकृत कात्यायनीचें आवाहन करून, तिचें पूजन करीत. हरिचंदन, देवदारु, रक्तचंदन, कृष्णागरु, गोरोचन, मलयागरु, कस्तुरी कर्पूर असे सुगंध देवीस वहात. चंपक, मोगरे, सेवंती, जाती, मालती, बकुळें, केतकी, कमळें अशीं सुपुष्पें अर्पण करीत. आघाडा, आम्र, दूर्वा, दर्भ, तुळशी, शिरीष, शमी यांचे कोंवळे तुरे, नारिकेल, जंबू, महाळुंग, रायावळे, निंबें, नारिंगें, द्राक्षें, केळें, सुपारी, वेलदोडे, लवंगा, कंकोळ, इत्यादी फळें देवीस देत. लाडू मोदकांचे नैवेद्य दाखवीत, तुपाचे दिवे ओवाळीत आणि शेवटीं नंदगोपाचा सुत आपला पती व्हावा अशी मुकुलित नयनांनीं प्रार्थना करीत. (कृष्णदयार्णव)

अशाच एकेदिनीं या व्रजगोपनितंबिनी यमुनेच्या तीरावर जाऊन, वस्त्रें तीरावर ठेवून, अतिशीतल अशा जलामध्यें दिगंबरस्नानाला उतरल्या. यमुनेचें निळें जल हेंच श्रीकृष्णाची श्यामल तनू असें मानून त्या यमुनेच्या जलालाच वेंगेत कवळूं लागल्या.





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

यमुनाजीवनांत बिंबित अशा आपल्याच चुंबनें घेऊं लागल्या. कृष्ण एकांतामधें सांपडला आहे; आतां स्वेच्छेनें रति भोगावयास हरकत नाहीं अशा भावानें त्या जलांत स्वानंदें करून विहरूं लागल्या. त्या अशा विहारांत दंग असतां कृष्ण हळूच आपल्या सवंगड्यासह तेथें आला आणि गोपींनीं तीरावर ठेवलेलीं वस्त्रें उचलून शेजारच्या नीप वृक्षावर जाऊन बसला. कृष्णाचें हें लाघव पाहून सर्व गोप खदखदां हंसले. कृष्णही त्यांच्यासह हंसला. कृष्णाच्या परिचित हास्य शब्दानें गोपींचें लक्ष त्याकडे वेधलें गेलें. त्या मनांत



आनंदनिर्भर होऊन सलज्जपणें एकमेकींकडे पाहूं लागल्या. कोणी उथळ जलांत येऊन कंठापर्यंत लपून बसल्या. हेमंत कालांतील तें जल त्यांना एकदम थंड वाटूं लागलें. त्यांतूनही सूर्योदयींचा दंवात आपल्या झुळुकांनीं त्यांना आर्त करूं लागला. त्यांची शरीरें थरथरां कांपूं लागलीं. दांत खडखडां वाजूं लागले. आणि थंडीनें व्याकूळ होऊन त्या कृष्णाशीं बोलूं लागल्या. कोणी 'पाषाण उचलून त्यावर मस्तक फोडतें' म्हणूं लागल्या. कोणी 'तशाच झाडावर चढूं आणि तुला शासन करूं' म्हणूं लागल्या. कोणी त्याला बावडीवर चल म्हणूं लागल्या. कोणी त्याला करुणा भाकून राजकुमारानें चोरी करणें हें अनुचित आहे असें म्हणाल्या.

कोणी नंद-यशोदेजवळ कागाळी करूं म्हणून भीती घालूं लागल्या. तर कोणी म्हणाल्या,

"करिशिल जशि आज्ञा तूं तसें अंग नाचे
करुं तुज वश ऐसे देह हे अंगनांचे
गरतिहि परि होऊं सुंदरा क्षिप्रदासी
तुज तनुही समर्पूं सर्व सौख्यप्रदासी ॥"
'वामन'

ज्यांचा मध्यभाग सुंदर अशा त्या सुमध्यमांची विनवणी ऐकून कृष्ण त्यांना म्हणाला, "तुम्हीं यमुनेमध्यें सगळ्या जलक्रीडा केल्यात. त्याचें प्रायश्चित्त म्हणून लाज सोडून पाण्याबाहेर या आणि हात वर करून सूर्याला नमस्कार करा. कदंबाच्या तळीं क्षणभर नाचा. मला डोळे भरून पाहूं दे. (श्रीधर)" कृष्णानें आरंभिलेला हा छळ पाहून गोपींनीं विरोध दर्शविला नाहीं. ज्याप्रमाणें पहिल्यांदाच गरोदर असणारी स्त्री नानाप्रकारचे कष्ट होत असतांही मनांत संतुष्टच असते. त्याप्रमाणें गोपीही अभिष्ट सुखांच्या अपेक्षेनें तृप्तच होत्या. (कृ.) त्या इंदुवदना दोन्हीकरांनी कामरुदनें झांकून धरीत, आणि एकमेकींना पुढें ढकलीत आणि त्यांच्यामागें लपत बाहेर आल्या (वा.) जी त्यांच्या पतीलाच नको होती ती लाज त्यांनी कां धरावी. (मो.) कोणी मदनालयावर हात ठेविले होते. तर कुणी कमलपत्रें नेसल्या होत्या. कोणी उघड्याच बसून मांडी आंवळून आपली लाज राखिली होती. कृष्णाची सुंदर तनुयष्टी बघून त्या कामिनींची दृष्टी त्यावर जडली होती. त्या नितंबिनी त्यावर आपल्या नयनांबुजाची वृष्टी करीत होत्या. पंचशरामुळें विव्हल होऊन आपली लुगडीं मागण्यासही त्या विसरल्या होत्या. त्यांची ही अवस्था पाहूनही कृष्णाला त्यांची दया आली नाहीं. कारण त्यांनी अजून दोन्ही ओंजळी वर उचलून दिवाकराला वंदन केलें नव्हतें. आणि तें वंदन केल्याशिवाय कृष्ण त्यांना वस्त्रें देणार नव्हता. शेवटी त्यांनी कृष्णाचे म्हणणें मान्य केलें आणि त्यांची अतिगोरीं अंगें पाहून श्रीहरी अंतरी सुखी झाले. कृष्णानें गिऱ्हाइक वृत्ति मनांत धरून त्यांची शरीरें न्याहाळून पाहिली. आणि नंतरच गोपनितंबिनींचा सुखकर्ता अशा त्या कृष्णानें त्यांची वस्त्रें त्यांना दिलीं. आपल्या अंगसुखाचा लाभ या गोपींना द्यावा अशी कृपा त्या भवभंजन कृष्णाला वाटली होती. परंतु कामरुदनावर हातांचा अडथळा असल्यानें तो काढल्याशिवाय वर देणें चक्रपाणीला शक्य नव्हतें. उदार अशा श्रीकृष्णाला ही गोष्ट युक्तिनेंच करणें भाग पडलें. यमुनेंत नग्न स्नान करणें हें पाप घडल्यानें त्याच्या निवारणासाठीं दोन्ही हात उचलून सूर्यास वंदन करणें क्रमप्राप्त अशी युक्ति त्यानें योजिली. वस्त्रें देतांनाही, 'हिचें तिला तिचें हिला' अशी चाळवणी करून कृष्णाला आणखी कांहीं वेळ काढतां आला आणि डोळे भरून निरीक्षण करतां आलें. (वा.) या गोपिका अजून अक्षत योनी आहेत हें पाहून जगदीश्वराला तोष वाटला (कृ.) या लीलांनी गोपी विव्हल झाल्या होत्या. त्या तेव्हांच श्रीपतीशी रमण्यासाठीं त्याला नेत्रकटाक्षांची माया दाखवूं लागल्या. (वा). हे भुवनसुंदरा, तूं आमचा काम शांत कर असें त्याला म्हणूं लागल्या (श्री.) परंतु एवढ्यांतच कामी जनांचा हाडवैरी असा रविराज उदयाला आला. त्यामुळें मनोभंग झाल्यानें गोपी बोटें मोडूं लागल्या. त्या कुमुदेक्षी गोपिका 'वरप्राप्तीचा योग कधीं येईल' असें कृष्णाला विचारूं लागल्या— "आत्तांच भोगावें तर प्रहांट झाली आहे आणि ग्रामस्थ येतांच बाजार भरेल. एवढें





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

असलें तरीही वर न देऊन चालणार नाहीं." अशा विचार करून त्यानां कृष्ण म्हणाला "तुम्हीं आतां घरीं जा. शरदृऋतु येईल, शोभिवंत चांदिण्या रात्रीं असतील, तरुवर फळलेले असतील तेव्हां मीं वृंदावनांतून मुरलीचा संकेत करीत तेव्हां तुम्ही या (श्री.) माझ्या प्रियतमा अशा तुम्ही श्यामा, तेव्हांच माझ्याचीं रमाल (वा.)" अशा प्रकारें शरद् ऋतूच्या रम्य रात्रींचा संकेत ठरवून कृष्णानें त्यांना निरोप दिला.

आणि यथाकाल शरद् ऋतु आला. गोपींचा पुण्यकाल आला. शर्वरी चन्द्रप्रभेनें शोभूं लागल्या. कुंज कुसुमित झाले. मधुपांचीं कूजनें गुंजूं लागली. (कृ.) पूर्वेचा प्रियकर चन्द्र पुष्कळ दिवसांनीं जवळ आलेल्या प्रियेचें लालन करणें त्याप्रमाणें पूर्वेच्या मुखावर आपल्या हातांनीं अंगराग रंगवूं लागला. सुखदायक गारवा आसमंतांत पसरला. (कृ.) हा उचित काल जाणून कृष्णानें 'आा अगे' असा पांवा वाजविला (वा.) तो वेणुध्वनी ऐकतांच गोपी कामानें परम व्याकूळ झाल्या (वा.) जें ऐकतांच वधूजनांची मनें वेडीं व्हावीं असें तें गीत माधुर्यांत अमृताला लाजवील असें गोड होतें. कुसुम गंधाकडे भ्रमर झेंपावावा तशा गोपी त्या गीताकडे आकृष्ट झाल्या आणि धांवत सुटल्या. त्या फक्त नादाचा वेध घेऊन धांवत होत्या त्यामुळें आपुलीं पाऊलें कुठें पडत आहेत याचेंही त्यांना भान नव्हतें. कुणी गोदोहनें तशींच सांडून आल्या होत्या. कुणाचीं सुग्रास पक्वान्नें चुलीवर करपत होतीं. कुणाच्या उखळांत अर्धेच कांडलेले गहूं पडले होते. कुणाचे पंक्तोस अर्धेच वाढून झालें होतें. कुणी आपल्या लेंकराच्या मुखांतून अर्धा प्यालेला स्तन ओढून काढला होता. कुणी सुखशेजेवर अर्ध अभिरत पतो तसाच सोडला होता कुणाच्या मुखांत अर्धेच चावलेले घांस होते. कोणी अर्धेच संपलेलें नग्नस्नान सोडलें होतें; त्यांच्या केंसांना, स्तनांना आणि मुखाला अर्धवट चोळलेली कस्तुरी तशीच लडबडलेली होती. कुणाचा एकच काजळकांठ रंगवून झाला होता तर काजळकाडी दुसऱ्या हातांत होती; कुणी पांघरूणें नेसल्या होत्या तर मंगळसूत्रें कंबरेस बांधलीं होतीं कुणी विडे वेणींत घातले होते तर कुणी फुलें तोंडांत घालून चावत होत्या; अशा प्रकारें एका वेणुनादाला लोभून त्या वावऱ्याप्रमाणें वृंदावनाकडे जात होत्या (कृ.) त्या अशा प्रकारें जात असतांना नीच असे गोप त्यांना विरोध करीत होते (मों. परंतु त्यांचे निवारण डावलून बलात्कारानें त्या वृंदावनांत गेल्या. (कृ.)

अशा प्रकारें गोपी वनांत आल्यावर कृष्णानें आश्चर्यांचा आव आणून त्यांना विचारलें, "तुम्ही साऱ्या अशा अवस्थेंत इथें धांवत आलां आहांत तर झालें आहे तरी काय? गोकुळ कुशल आहे ना?" कृष्णाच्या या म्हणण्यावर गोपी काय उत्तर देणार? त्या मृगलोचना सलज्ज कटाक्ष टाकून कृष्णाचें मन मोहूं लागल्या. तेव्हां त्रैलोक्य राणा त्यांना म्हणाला, "स्त्रियांना भीरू असें म्हणतात. आणि तुम्ही तर या घोर रात्रीं दुर्गम वनांत आलां आहांत. घरीं तुमच्या स्वजनांना काळजीनें हृद्रोग लागला असेल. तेव्हां आतां घरीं जा कशा! तुम्ही कदाचित वन विहारासाठीं आलां असलांत




"किर्लोस्कर एंजिनें हीच माझ्या अभिमानाची गोष्ट!" - श्री. आपटे

मी एक शेतकरी आहे. मी '५०/५५ एकरांत शेतीची ऊंस, केळीं, पडवळें, भाजीपाला, भात, अशी पिकें करितो. गेली ९/१० वर्षें मी किर्लोस्कर इंजिनें वापरीत आहे आणि मला त्याबाबत कधींही तक्रार करावी लागलेली नाहीं. आमच्या खेडेवळ भाषेंत आम्हांस ही इंजिनें पाग आहेत. आपल्या देशांत ही इंजिनें होतात याचा मला फार अभिमान वाटतो, आणि तसा सर्वांना वाटावा अशीच ही इंजिनें आहेत. कळावें.

(शंकर गोपीनाथ आपटे)

किर्लोस्कर ऑईल एंजिन्स लि., खडकी, पुणें ३.

किर्लोस्कर एंजिनांची गरज किर्लोस्कर एंजिनेंच भरून काढतात!

KOEL/M-6/60 (1)

TOM & BAY






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तर हें सुपुष्पित वन, हा पूर्ण शशांक, हा यमुनाजलावरून झुळझुळणारा मंदवारा, हे चंचल तरु पल्लवें पाहिलेतच. आतां क्षणभरही इथें थांबूं नका." कृष्णाचा हा उपदेश ऐकूनही गोपींनीं आपल्या, कटाक्षांचा वर्षाव चालूच ठेवला. शेवटीं त्या कटाक्षांचा अर्थ कळला असें दाखवून कृष्णानें त्यांना जार-बुद्धी विरुद्ध उपदेश केला, कीं, चोर प्रेम हें घाईघाईत करावें लागत असल्यानें त्यांत यथासांगपणा नसतो. सुखहि अपुरेंच असतें. धोके मात्र भयंकर असतात. कारण जी गर्भधारणा पतिव्रतेला आयुष्यभर कष्ट करून होत नाहीं ती चोरट्या प्रेमाच्या एकाच आविष्कारांत होते. आणि या गर्भाचे सोहळे एकाच बाजूस राहून जीव लपविण्यास जागा रहात नाहीं तरी उपपतीचा नाद न धरतां आपल्या वृद्ध, रोगी, रागीट अशाही पतीशी पातिव्रत्य राखावें असा साध्वी स्त्रियांचा धर्म आहे. (कृ.) अशा उपदेश ऐकून त्या सुरत-भग्न मनोरथ झाल्या आणि त्यांच्या नेत्रांत शोकनद्या वाहिल्या. (वा.) त्या कृष्णाला म्हणाल्या, "देवा असें क्रूर बोलूं नकोस. स्मरशरांची आग आतां आम्हांला सहन होत नाहीं. यांतून तुझ्या अधरींचे अमृतच आम्हांला वांचवील. तुझ्या चरणीं सर्वस्व अर्पण हाच आम्ही धर्म मानतों. आम्ही कामाग्नींत कापुराप्रमाणे जळत आहोंत. तुझ्या अधरसुधेचा निका पूर वाहिल्या शिवाय हा अबलासमूह वांचणार नाहीं. आम्हीं घराला विटलों. तुझ्या शिवाय दुसऱ्याचें स्मरण ओकारी प्रमाणें वाटतें. कोकिलाचे गुण बेडकांत, येतील का? अमृताची माधुरी कांजीलूं येईल का? आमचे स्तन तापलेले आहेत. तुझें शीतल करकमल त्यांवर पडल्याशिवाय त्यांचा ताप सरणार नाहीं. (मो.) आम्ही कुलीन आहोंत सहसा परपुरुषाला वश होणार नाहीं. पण जिला तुझाही मोह पडत नाहीं अशी स्त्री कोण बरें आहे? हळूच आमचें चित्त चोरून आतां घरीं जा असें तूं म्हणतोस त्या आम्ही कशा जाऊं? (वा.) तुझें वेणुगीत ऐकून कोणाचा व्रतभंग होणार नाहीं? तुझें गीत ऐकूनही जी पातिव्रत्य राखील अशी स्त्री अजून ब्रह्म-देवानें निर्मिली नाहीं. तरी आतां हाच निश्चय आहे कीं आमच्यावर कोणताही दोष न ठेवतां तूं आमची प्रार्थना मान्य कर.

स्तनीं आननीं आपादमौळीं।
मर्दी चुंबी आणि कुरवाळीं॥
आपुल्या शंतम पाणी कमळीं।
श्रीवनमाळी सर्वज्ञा॥
तव गानश्रवणें कामाग्नि तप्त।
तेणें सर्वांग झालें व्याप्त॥
करसरोजें कुच संतप्त।
निववीं त्वरित पुंभावें॥" (कृ.)

गोपींची ही प्रार्थना ऐकून लीला लालस वासुदेव उत्फुल्ल अवयवीं टवटविल्या अशा प्रसन्न वदनीं गोपींवर कृपा करता झाला. गोपींना घेऊन तो यमुना तीरावर गेला. तेथें सुशीतल सिकतेचें रम्य मृदुल पुलीन पसरलें होतें. मंदानिलानें कुमुदें तरल झालीं होती. त्यांचा परिमल चहुबार कोंदला होता. (कृ.) तेथें रासमंडळ रचून कृष्णानें नाचाला सुरवात केली. पदन्यास करणाऱ्या कामिनी विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागल्या.

'असो नाचतां रास मंडळीं।
गोपी मुखामुख लावी वनमाळी॥
तांबूल घाली मुखकमळीं।
सुखी वेल्हाळी होति त्या॥
चंदनें चर्चित हस्त।
गोपींच्या कुचयुगीं ठेवित॥
क्षणक्षणां चुंबनें देत।
नाचत नाचत तयांतें॥
ऐशा नाचतां भागल्या कामिनी।
हरिकंठीं मिठी घालोनी॥
मग सुरत युद्धा लागोनी।
सुखशयनीं प्रवर्तल्या॥
गोपींचें कुच कुंकुमें चर्चित।
हरि अंगीं त्या मुद्रा उमटत॥
कस्तुरी मळवट पुसत।
मुख चुंबिता परस्परें॥ (श्रीधर)

(पान १४ वरून चालू)

लागली. तिथलं रक्त पुन्हां सळसळूं लागलं. तूं तुझी प्रतिज्ञा मोडली होतीस. ती मंगल शर्वरी तूं विसरली होतीस. माझ्या सांडलेल्या रक्ताच्या साक्षीनें घेतलेली शपथ तूं मोडली होतीस. स्त्रीत्वाच्या उज्ज्वल कल्पना तुझ्या तूंच अनृत ठरविल्या होत्यास. तुझ्या ध्वज-पताका आज धुळींत लोळत होत्या. त्या दिव्य क्षणावरहि तूं आज प्रहार केले होतेस. तुझा आज सारीकडून पराजय झाला होता. तूं पराजिता झाली आहेस. प्रभा, आज तूं पराजिता झाली आहेस. आणि आश्चर्याची गोष्ट होती कीं, पराजित असून तूं प्रफुल्लित होतीस. एके काळीं, माझा हक्क असलेल्या वृक्षावर आज तुझ्या नवऱ्यानें स्वतःचें असें कलम जोडलं होतें. आणि तें वाढलेलें बांडगूळ हाता-वर तोलून धरीत तूं माझ्या समोरून मोठ्या आनंदांत चालली होतीस. आज तूं मादी ठरली आहेस. प्रभा, आज तूं केवळ मादी ठरली आहेस. विश्वाचें प्रचंड रंगमंच माझ्या डोळ्यापुढें पुन्हां गरगरलें. कालपर्यंत पूजीत आलेल्या तुझ्या मूर्तीवर मी विलक्षण आवेगानें घाव घालूं लागलों. अनंत योजनें मी तुझ्यापासून पुन्हां दूर आलोंय आज! तुझ्या स्मृतींच्या अस्थींनांहि मी पुन्हां अग्नि दिलाय. त्याच्या दिव्य प्रकाशांत माझं मन वेड्यासारखें हंसत सुटलें आहे—

मी मागें वळून पाहात होतों. समर्थांच्या प्रशान्त मूर्तिसमोर तूं मनोभावें हात जोडून उभी होतीस. काय अधिकार होता तुला त्या वैराग्याला नमस्कार करण्याचा? बहुतेक आणखी एका अपत्याची मागणी तूं त्यांना प्रार्थित असावीस. आईच्या कर्तव्यानें तूं तुझ्या मुलालाहि नमस्कार करायला सांगितलास. त्यानें आपले चिमुकले हात जोडले. तुझं तें भयानक कर्तृत्व मी माझ्या तारवट-लेल्या डोळ्यांनीं पाहात होतों. आणि दुसऱ्याचक्षणीं माझ्या डोळ्यांसमोर एक सुखद चित्र तरळलें. एकाएकीं त्या देवळांतून एक प्रेतयात्रा बाहेर आली. पांढऱ्या शुभ्र चादरींत गुंडाळलेलं तुझ्या मुलाचं प्रेत घेऊन दोन-चार पुरुष मंडळी चालली होती. आणि तूं कपाळ बडवीत, आरडाओरडा करीत त्यांच्यामागें धांवत होतीस. माझं मन असुरी आनंदानें हंसत होतं. खदखदून हंसत होतं आणि ओरडत होतं—'

"आज तूं पराजिता झाली आहेस...प्रभा, आज तूं संपूर्ण पराजिता झाली आहेस...!"

• • •


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कृष्ण या "क्रीडेंत जे सुरत संभ्रमभाव दावी॥ ते कामशास्त्रगतें काय विभा वदावी॥ (वा). त्यानें लक्ष्मीशीं जशी केली, होत असे तशीच गोपीशीं क्रीडा केली त्यामुळें लक्ष्मी लज्जावती झाली. (मो.)

बाहुप्रसरण आलिंगन ।
वेणीग्रहण मुखचुंबन ॥
पाणीग्रहण कुचमर्दन ।
नीवीमोक्षण संस्पर्श ॥
विमुक्त कंचुकी विगतानीवीं ।
करलालन सर्वावयवीं ॥
हनुगल्लोरू करपल्लवी ।
सस्मित भावीं परि हसती ॥
मंजुळ कोमल विनोदवचनीं ।
कुचादि नखाग्रपरिपातनीं ॥
सादर अवयव निरीक्षणीं ।
अधरपानी स्मितवक्त्री ॥
इत्यादि क्रीडा सविस्तर ।
कंदर्परहस्य शास्त्रानुसार ॥
सुभगशिक्षीत नारीनर ।
दुर्लभ तर त्रैलोक्यीं ॥ (कृ)

अशा प्रकारचें वरदान गोपींना प्राप्त झाल्यामुळें त्यांना अभिमान उत्पन्न झाला कीं आपल्याजवळ तारुण्य बहर आहे; शृंगार-कलेचें विशेष चातुर्य आहे; आपण सुभगा आहोत; वरांगना आहोंत; दुसऱ्या स्त्रिया हीन आहेत; जग हें आतां तृणासमान आहे. कृष्णाशीं सुरतानंद भोगतांना त्यांना मद चेढून त्याचा उन्माद झाला. कृष्ण वश झाला असें त्यांना वाटूं लागलें. अर्थात् कृष्णाला अशी भूमिका नको होती. म्हणून विरहाचा चटका देऊन त्यांना शुद्धीवर आणण्यासाठीं कृष्ण लगेच गुप्त झाला.

प्रणयरंगाचे उधान आलें असतानाच कांत अदृश्य झाल्यानें त्या कामिनी वेडा-वल्या आणि वनांत कृष्णाला शोधूं लागल्या. भोवतीच्या जाई, जुई, चंपक, वट, मालती, पारिजातक अश्वत्थ, बिल्व, अंजीर, मांदार, कदंब अशा लहानथोर वृक्षलतांना त्यांनी कृष्णाची माहिती विचारली. भ्रमर, मयूर, राजहंस, चक्रवाक, नकुल, जे जे कोणी दिसलें त्यांना त्यांनी कृष्णाचा पत्ता विचारला (श्री.) धरित्रीला कृष्णचरणांचा स्पर्श अजूनही होत आहे म्हणून त्यांना तिचा मत्सर वाटला. ज्याच्या गळ्यांतील कुंद-मालेला कांतासंग करतांना तिच्या स्तनाचें कुंकुम लागून लालिमा आला आहे अशा हरीचें दर्शन झाल्यामुळेंच कुरंगिणी आनंदानें वागडत आहेत असें त्यांना वाटलें. या कुरंगिणींना आपल्या कचपाशांतून कृष्णसंग करतांना निसटलेले केस त्या कुंदमालांत अडकलेले दिसले असतील याची त्यांना खात्री वाटली. लतांची मुकुलित अवस्था पाहून त्यांना वाटलें कीं कृष्णाच्या नखांच्या स्पर्शानें आपल्या स्तनांवर जसे रोमांचित कळे फुलतात तसे ज्याअर्थीं या लतांवर फुलले आहेत त्याअर्थीं त्यांना कृष्ण भेटलाच असणार. अशाप्रकारें वनांत पिशासारखा कृष्णाचा शोध घेऊन त्या शिणल्या आणि मनोविनोदनासाठीं त्यांनी कृष्ण चरित्राचें नाटक करावयास सुरवात केली.

एक बाळकृष्ण होऊन निजली. दुसरीनें पूतना मावशी होऊन कृष्णास मांडीवर घेतलें आणि आपला स्तन उघडून चूचुक त्या कृष्णरूप गोपीच्या मुखांत दिला. आणि तो चोखला जाऊं लागतांच 'मेलें मेलें' अशी आरोळी ठोकून हातपाय पसरिले. कोणी




Swastik
brings
versatile rubber
in your
service

Every day rubber is being put to new uses. For the new India of progress and prosperity. SWASTIK brings the fruits of research and development. Every move that SWASTIK makes is to make your life happier, more comfortable. SWASTIK Quality Rubber Goods: Gum Boots, Hoses, Surgical Gloves, Electric Cables, Industrial Rubber Accessories.

Swastik
QUALITY
RUBBER
GOODS



RUBBER PRODUCTS LIMITED, KIRKEE, POONA-3.

SRP/6-10/59 OM & SAY.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

शकट कोणी चक्रवात होऊन कृष्ण झालेल्या गोपीना छातीशीं आवळिलें. "मी कृष्णाप्रमाणें चालून दाखवितें" म्हणून एकजण आपलीं सुंदर अंगें हालवीत, चालूं लागली. एकीनें वस्त्रें फेडून त्यांचा लटिकाच गोवर्धन बनविला आणि तो करांगुलीवर उचलिला. कुणी कालियामर्दन केलें. (कृ.)

असें करीत फिरतां फिरतां मधेंच त्यांना कृष्णाच्या पाऊलांची रांग कोणा नितंबिनीच्या पाऊलरेखेंत मिळून मिसळून उठलेली दिसून आली. त्यानें कामाग्नि आणि मत्सर प्रक्षुब्ध झाला आणि त्या त्या पावलटीचा मागोवा घेत विचार करूं लागल्या.

"ही सटवी कोण असावी बरें? कृष्णाच्या खांद्यावर हात टाकून पाऊलांवर पाऊलें टाकीत ही कोण बरें गेली? केतकीच्या कंटकपत्राप्रमाणें आमचा त्याग करून कृष्णानें केतकीपुष्पाप्रमाणें जिचीं गात्रें भोगिलीं अशी ही कोण? कृष्णाची येथील पदधूली चुंबावी तों तेही सुख आपणास नाहीं. कारण त्या पाऊलांत सवतीची पाऊलें मिसळलीं आहेत. ही इथें फक्त कृष्णाचीच पाऊलें दिसतात खरी. पण याचा अर्थ एवढाच कीं सवतीच्या पायाला तृणांकुर टोचले म्हणून त्या लंपटानें तिला खांद्यावर घेतलें असणार. तिच्या भारानेंच या त्याच्या टांचा इतक्या खोल रुतल्या आहेत. इथें तर कृष्णानें चवड्यांवर उभें राहून या कांटेरी झाडाचीं फुलें ओरबडून प्रियेची ओटी भरली आहे. कृष्णाचे हात कोमल म्हणून विचारी कमला आपल्या मृदु स्तनानें त्याचें मर्दन करते आणि तो लंपट त्याच हातांनी झाडें ओरबडून आपल्या प्रियेची ओटी भरतो याची खात्रीच या ओरबडलेल्या वेलीवरून दिसत आहे. आणि ही पाऊलांची खूण पाहिली का? दोन बाजूना कृष्णाची पाऊलें आणि मधें तिचीं पाऊलें. खासच इथें आपल्या गुढघ्यांच्या मधें तिला चिकटवून बसवून त्या लंपटानें तिचा बुचडा सोडून वेणी घातली असणार! वानरासन घालून इथेंच त्यानें तिच्या खोप्यांत कुंद-मोगऱ्यांचा हार घालून वर केतकीपत्र दुमडलें असणार! पण सन्मान केला म्हणून ती विनयभावानें थोडीच नम्र रहाणार? बाईलवेडा नवरा मिळाला की बायका कुंथून दुखणें काढतात आणि डोक्यावर बसतात. अग बाई! ती बघा सटवी पलीकडे रडत बसली आहे. शेफारून डोक्यावर बसायला गेली तेव्हां कृष्ण झुकांडी देऊन गेला वाटतें." (कृ.)

असा विचार करीत गोपी तिच्याकडे आल्या. सवत समदुःखी झाल्यावर सखी झाली, आणि तिला संगतीं घेऊन पुन्हां कृष्णाचा शोध सुरू झाला. आणि सर्व वन शोधूनही कृष्ण नजरेला पडला नाहीं तेव्हां त्या कृष्णाचा धांवा करूं लागल्या. (मो.)

गोपी म्हणाल्या, "हे प्रियतमा, तुझें प्रिय करावयाची आशा धरूनच आम्ही जन्मापासून तुजसाठीं प्राण धारण केले. दोही बाहीं तुझ्या कंठी मिठी घालावी, हीच आमची एक हांव. तूं मधु, आमुचे नयन मधुमक्षिका, ते तुजवरून उठूही शकत नाहींत. तूं इतका वेळ नजरेआड झाला आहेस. आमचे प्राण नेत्रांत गोळा झाले आहेत. ते आतां निघून गेले तर त्याला तुजशिवाय दुसरें कोणतें कारण असेल बरें? तुझ्याकडून कसल्याही मोलाची अपेक्षा न करितां आम्हीं किंकरी तुला मन्मथसमरांत वश झालों त्यांना नेत्र कटाक्षांनीं विंधून टाकून देणें हा आमचा वधच नव्हे काय? आम्हांस असें मारायचें होतें तर आजवर इतक्या संकटांतून कां रे वाचविलेंस? तूं 'साऱ्याचा प्रतिपाळ करतों' म्हणतोस आणि नेत्रकटाक्षांच्या कामबाणांनीं आमचाच तेवढा संहार कां रे करतोस? तूं आमचेही मनोरथ पुरे करना! आमच्या शिरावर तुझा कमलकर ठेव ना! तुझा वदनचन्द्र दाखवून आम्हाला जीवदान देना! तुझ्या चरणानें आमचे पयोधर रगड ना! आम्हांला अधरींचें अमृत देना! शंकराचा वैरी मदन आमच्या स्तनप्रांतीं फुफाटला आहे. त्यानें जरी त्रिजग जिंकिलें असेलें तरी कालियामर्दन करणाऱ्या

## गेली ती पेशवाई !!!



"भोजनसमयीं समया खाशाचे पंगतीस दोन पात्राआड एक व वरकड पंगतीस चार पात्राआड एक याप्रमाणें उजळ समया वाती उजळून चांगल्या कोरड्या न राहता भिजवून तेल निवळ पांढरे असेल ते घालून पात्रावर न पाडतां तजविजीनें झाऱ्यानी समयावर घालावे. रुप्याच्या समया खासे पंगतीस मांडाव्या. त्याजवर तेल रुप्याचे झाऱ्यानी घालावे. गुलदांनानी गूल काडावे."......"भोजन साहित्य आचारी चांगले शहाणे लावून स्वयंपाक चांगला करावा. पात्रांचा अदमास पुसोन घेऊन दोन प्रहरात भोजने होत अशी तजवीज करावी. लोणची भाज्या वगैरे उष्ण रसाच्या, एक सारख्या हारीने वाटोळ्या वाढाव्या, एकास एक लावू नये. आंबटी, सांबारे, वरण, क्षीर, यांचे थेंबटे मध्यें पडू नयेत. तूप रुप्याचे तोटीच्या कासंड्यानीं वाढावे. प्यावयाचे पाणी गाळून शीतळ करावे. वेळा, वाळा कापूर, लावून उदवून ते सिद्ध करावे. सर्वांस भोजनसमयी व फराळसमयी देत जावे. भोजनोत्तर आंचवावयास उष्ण पाणी व हातास लावावयास साखर व दात कोरावयास लवंगा याप्रमाणें देत जावे."

..."फराळाचे सामान—लोणची पांच प्रकारची व पापड, सांडगे, कोशिंबिरी दहा प्रकारच्या. पक्वान्ने व लाडू, पोहे आंबेमोहोर बारीक भात व खानदेशातून नवे पोहे आणवून ते व मासबरास लाह्या, खारीक, खोबरे, खजूर, बदाम, पिस्ते, नारळ, मेवा वगैरे मेवामिठाई. दही, दूध, तूप साजूक व मध्य, मुरंबे..."

"पेशवेकालीन महाराष्ट्र"

— दिश्रीक




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तुझ्या चरणांना तो सहज जिंक्य आहे. ते तुझे चरण आमच्या कुचांवर ठेऊन या वधूकंदर्पाचें मर्दन तूं करना ! आम्हीं मन्मथ-शरांनी मरून स्मरपंजरीं पडलों आहों. तुझें अधरामृतच आम्हाला जीवदान देईल. तुझें कथामृत अधरामृतापेक्षां थोर आहे असें म्हणतात. पण तुझ्या विलासानें उत्पन्न झालेला कामोद्भव तें शांतवूं शकत नाहीं. एकांत विलास चालू असतां कुशल विलासिनींना कवेंत धरून चुंबनें घेतांना तूं ज्या संकेत-नर्मोक्ति बोलतोस त्यांचे स्मरण आम्हाला विंचवाप्रमाणें दंश करीत आहे. घरीं सासूचे बोल आम्हाला जशी घरे पाडीत नाहीत तशीं घरे तुझ्या चरणाला वनांत तृणांकुर रुतत असतील ही कल्पना आम्हांला पाडते याची तुला जाणींव आहे काय ? तूं तर असा कपटी आहेस कीं आपलें वदन दाखवून आमचा मन्मथ तूं वाढवितोस पण आपला एकांत देऊन त्याचें शमन मात्र करीत नाहींस. तुझ्या वेणुगीतानें उत्पन्न झालेल्या ज्वरानें आमचा देह व्यापिला आहे. तुझें रतिलास्य हाच त्यावर उपाय. तरी आतां सदय होऊन तो उपाय तूं कर ना ! अमंगल असा विरहानल आम्हाला जाळीत आहे त्याचा उतारा. तुला माहीत आहे. केवळ लाज वाटते म्हणूनच आम्हीं त्याचें नांव घेऊं शकत नाहीं. तूं परम रहस्यानें हा उतारा देऊं शकतोस. मग आता कृपणता सोड ना ! आमचें नववय बहरलें आहे. त्यामुळें स्तन कठोर झाले आहेत. तुझ्या कुमुदाहून मऊ अशा चरणांना मर्दन करतांना आम्ही दुखविणार नाहीं. आम्हीं आमच्या स्तनानीं तुझ्या पदांना न दुखवितां हळुहळूच स्पर्श करूं आणि सुखनवाळी मोगूं. तुझ्या चरणांना आम्ही आमच्या प्राणाची गवसणी घालून घरीं दिवस काढीत असतो; तूं अवघा वेळ वनांत फिरत असतोंस. आणि आम्ही घरीं तुझ्यासाठीं व्याकूळ होऊन वेळ कंठितों, हें माहित नाहीं म्हणून आतां आम्हांला इथें टाकून तूं गेला आहेस काय ? आम्हाला दर्शन देना ! भेट देना ! ''

अशा प्रकारें गोपींनीं अनन्य भावानें कृष्णाची आळवणी केल्यावर कृपेनें कोंवळा झालेल्या अशा कृष्णाला करुणा आली आणि तो प्रकट झाला. (कृ) कृष्ण जवळ येतांच संर्व गोपी एका क्षणांत खडबडून उठल्या.


## हरवलें तें गवसले कां ?....

हरवलेली मीना सापडली तेव्हां तिच्या आई-वडिलांच्या आनंदाला पारावारच उरला नाहीं. मुलाबाळांच्या सुखा करितां तुमची केवढी धडपड असते ! पण एखादे वेळीं तुम्हीच कुटुंबाला पारखे झालांत तर—तुमच्या कुटुंबाचे भवितव्य सुरक्षित राहील काय ? आयुर्विम्यामुळेंच ही सुरक्षितता लाभूं शकेल. तुम्ही हयात असा अगर नसा तुमच्या मुलाबाळासाठीं ठरविलेल्या योजना आयुर्विम्यामुळें पूर्ण होऊं शकतील. विमा अेजंट अधिक माहिती समजावून सांगेल.

आयुर्विम्याला दुसरा पर्याय नाहीं



लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

चन्द्रोदयीं कुमुदिनी उमलाव्या तशा त्या उल्लासल्या. साऱ्या एकदमच कृष्णाला मिठी मारण्यासाठीं सरसावल्या. कोणी दोन्ही हातांनीं त्याचा हातच पकडला. कोणी त्याचा खांदा धरला; तर कोणी त्याची बोटेंच चुंबिलीं. कोणी त्याच्या मुखांतील तांबूलच घेतला तर कोणी त्याचे पाय उराशीं आवळिले: कोणी त्याचे तळवे चुंबिले तर कोणी त्याचे हस्त आपले खांद्यावर धरिले. त्यांचा भाव जाणून संतोष पावलेला कृष्ण त्यांना घेऊन यमुनेच्या पुलिनावर आला. यमुनेनें आपल्या तरल अशा तरंगकरांनी या पुलिनाची रचना मृदुल शयनासारखी केली होती. आपल्या स्वामीस विलास करावयाचा आहे असें जाणून अकालींही वसंतानें काननें शोभविलीं होतीं. कुंदांच्या कुसुमित कुंजांवरून मंद सुगंधित वायुलहरी झुळकत होत्या. कुमुदांच्या उदरांत लावलेल्या अलिकुलांची रुणझुण त्यां पवनपंथावर तरलत होती. शरद्‌चंद्राचे किरण निशेच्या गर्भोतील तमोकण पिवून टाकीत होते. त्यामुळें शोभायमान झालेली शर्वरी कल्याण स्वरुपानें मिरवत होती. गोपींच्या मनीचा हृद्रोग आतां लोपला होता. पुलीनावर यमुनेनें शयन पसरिलें असलें तरी तेथें पोंचतांच गोपींनीं आपलीं उत्तरीय वस्त्रें फेडून कृष्णासाठीं आसन बनविलें. कुच-कुंकुमाच्या चिन्हानीं सुशोभित दिसणाऱ्या त्या आसनांचा कृष्णानें स्वीकार केला. कृष्ण आसनस्थ झाल्यावर गोपीनीं त्याचे चरण आपल्या मांडीवर घेऊन चुरावयास प्रारंभ केला. चरण संवाहन करतांनाच गोपी त्याला सकोप पण कौशल्यानें विचारलेल्या प्रश्नानीं छेडूं लागल्या. कृष्ण त्यांचे सांत्वन करीत म्हणाला, “गांठ देऊन ओढलें कीं बंधनें दृढ होतात. मीही तुमच्या नजरेआड होऊन तसेंच तुम्हाला माझ्याकडे वेधून घेतलें आहे. मी लपून तुमचींच प्रेमवचनें ऐकत होतों. गुप्त होऊन मी तुम्हालाच भजत होतों. तुमचाच प्रेमा वाढवीत होतों. तरी मजवर राग धरूं नये” अशा प्रकारें बोलतांना त्याचें निष्कपट मन भरून आलें. फुल्लारलेल्या शरदुत्पलांच्या पंक्तींतून उषःकालीं शशिस्रावी जलधारा ओघळाव्या तशा त्याच्या नयनोत्पलांतून प्रेमाश्रुधारा ओघळूं लागल्या. त्याची अंगयष्टी थरथरां कापूं लागली. श्वास पोटांत मावेना. कंठांत उकसाबुकसीं सद्‌गदणारे शब्द ओठांत फुटेनांत. शेवटीं तो गोपीना म्हणाला, “तुम्हास जो त्रास झाला त्याचा परिहार मी कसा करणार ! कल्पांतापर्यंत मी तुमचा दास झालों तरी तुमचें ऋण फिटणार नाहीं. तुम्हीं तर जन्मापासून अभुक्त असें आत्मार्पण मला केलें आहे. मी तुमच्या ऋणामध्यें पूर्ण बुडालो आहे. तरी आतां आपल्या सुशीलपणानें मी ऋणमुक्त होईन असे करावयास तुम्हीच समर्थ आहांत” (कृ.)

कृष्णाचे हें वचन ऐकून हरपलें निधान गवसावें तशा गोपी आनंदल्या. त्यांतर सर्वांचा काम पुरविण्यासाठीं कृष्ण रासमंडळ रचावयास प्रवृत्त झाला: (श्री.) एकमेकांच्या गळ्यांत कर घालून गोपी मालाकार नाचूं लागल्या. कृष्ण जणूं मेघ आणि त्याभोवती नाचणाऱ्या गोपी या विद्युल्लता असें वाटूं लागलें. कृष्णगोपीच्या एकत्र नाचरंगामुळें गंगायमुनेच्या शुभ्र सांवळ्या संगमांत तरल कल्लोल आंदोलावें तसें दिसलें. गोपीचे कुच-कुंभ हेच जणूंकाय तारक असें मानून कृष्ण त्यांच्या आराधनें पोहत आहे असें दिसलें. कोणी नाचतांना मुख मुखास लावून तांबूल-दान करूं लागल्या. कोणी श्रीमूर्तीचे कर श्रांत कुचांवर ठेऊं लागल्या, तर कोणी मुखांत मुख घालून ओंठ आस्वादूं लागल्या. (वा.) दोन बाजूच्या दोन्ही गोपींच्या खांद्यावरून बाहू घालून कृष्णानें त्यांचे उरोज धरिले. गोपींच्या पदभूषणांचा नाद कल्लोळखच पावला. ही रासक्रीडा पहातांच कंदर्पानें लाजेनें मान खालीं घातली. गोपवधू नाचतच होत्या. केसांच्या कुरळ गांठी सुटून वेण्यांतील सुमनांचा पायांतळीं खच पडत होता. त्यांवर नाचतां नाचतां कृष्णाला अवयव स्पर्श करून गोपी सुखावत होत्या; नर्मोक्तिचीं भाषणें करीत होत्या; स्निग्ध कटाक्ष टांकीत होत्या; कृष्णाचा कर उचलून हृदयाशीं कुरवाळीत होत्या. हळूहळू त्यांची इंद्रियें विकल होऊं लागलीं. उत्तरीयांच्या आणि वस्त्रांच्या गांठी सुटून तीं तीं चरणतळीं ओघळलीं. रतिरंग-संगरांत परिश्रांत झालेल्या वज्रसुंदरीच्या मुखकमलावर स्वेदकणिका उगवल्या. गोपींना आलेला हा सुरतस्वेद कृष्णानें आपल्या सुखकर करतळें पुशिला. गाढालिंगन, कटि-संघटन, अधरपान, स्निग्धावलोकन, कर-स्पर्शन अशा उपायांनीं गोपीनीं कृष्ण पूजिला. कृष्णकरांचा स्पर्श कुचतटांना झाल्यावर अंतरांत उसळणारा प्रमोद गोपींच्या मुखांतून कृष्णगीतरूपें प्रकट झाला. अशा प्रकारें स्थलक्रीडा केल्यावर गोपीसह जलक्रीडा करण्यासाठीं कृष्ण यमुनेंत प्रवेशला. एकमेकांवर पाणी शिंपितां शिंपितां यमुना जलांत मोठाच रंग उसळला. कालिंदी काळी–कृष्ण काळा. गोपी तेवढ्या विजेप्रमाणें चमचमणाऱ्या. जलावर तरंगणाऱ्या त्यांच्या गोऱ्या स्तनांवर कृष्णाचा हात यमुनेच्या डोहांत फुललेल्या श्वेतकमलावरील निळ्या भ्रमराप्रमाणें शोभत होता. अशाप्रकारें जलक्रीडा संपल्यावर कृष्ण वनक्रीडा करता झाला. (कृ.) या क्रीडेचे वेळीं—

गांठी कंचुकिच्या जगद्‌गुरु—
करें गोपींचीया सुटल्या ।
नीवीमोक्ष मुकुंद हस्तकमळें
तो मोक्ष त्या लाधल्या ॥ वा ॥
जलकेली वनकेली ॥
करुनि स्त्रीमंडळी सुपावन केली ॥

(पान २६ वर)

भारत-सरकारकडून “रजिस्टर्ड” केलेलें—

## ❀ पांढऱ्या डागांचे औषध ❀

आमचें हें औषध सन १९३६ पासून प्रसिद्ध आहे: या दीर्घ कालामध्यें हजारों लोकांनी याचा अनुभव घेऊन प्रशस्तीपत्रें पाठविलीं आहेत. असें हें पांढऱ्या कोडाचें अनुभवसिद्ध औषध; किं. ५ रु., पोस्ट खर्च १। रु. माहिती मागवा, मोफत पाठवूं, म्हणजे खात्री पटेल.

**इसब्राचें** अनुभवसिद्ध औषध, किं. ५ रु. मनिऑर्डरनें पाठवा. औषध माहितीसह रजिस्टर्डने पाठवूं. मनिऑर्डर-कूपनवर आपला पत्ता सुवाच्य अक्षरांत लिहावा.

वैद्य–के. आर. बोरकर (वली) मु. पो.–मंगरूळपीर, जि.–अकोला (महाराष्ट्र)




अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# भोळा सांब

*—तिचं तें भेसूर हास्य बघून मीं कोरडया डोळ्यांनीं आवाज न करतां ऊर फाटल्या-सारखा रडत होतों. कारण तिचा एक तप-किरी डोळा हंसता हंसता हालत होता—*

ललित वालावलकर

तिचं हास्य तिच्या दोंन डोळ्यांत होतं. ती हसूं लागली कीं लालबुंद पातळ ओंठ विलग होत, उजवीकडे किंचित् वर जात आणि जरा पुढें असलेले दांत बघणाऱ्याच्या नजरेंत भरत. पण तिच्या ओठांत कांहीं म्हणण्या-सारखं आकर्षण नव्हतं. आपल्या टपोऱ्या तपकिरी डोळ्यांनीं ती खरीखुरी हांसे, भीडभाड झुगारून, मर्यादा गुंडाळून निःसंकोचपणें मनमुराद हांसे.

त्या डोळ्यांच्या जादूनें असहाय्य होऊन त्यांच्याकडे टक लावून पहाण्यांत मी किती तरी काळाचा अपव्यय केला होता. दुसऱ्या लोकांवर त्यांची मोहिनी पडली नाहीं कीं मला अचंबा वाटे. उदाहरणार्थ माधव गोखले...

एक दिवस मनाचा मोठा हिय्या केल्याचा आव आणीत मला म्हणाला, "दीक्षित तसा गैरसमज करून घेऊं नका, पण एकदां बोलून टाकतों. आपली ती मिस् सितलानी "

'मलाही फार आवडते' असं कांहीं गोखले सांगणार, आणि प्रेमांत व युद्धांत सर्व कांहीं क्षम्य असतं असा एखादा वायफळ उद्गार मला काढावा लागणार ही माझी अपेक्षा होती. पण तो बोलला कांहीं निराळंच.

"माझ्याहि मागें लागली होती कांहीं दिवस. पण मी तिची डाळ शिजूं दिली नाहीं. ती लगटपणा करणार आणि तुम्हीं आहांत भोळे सांब, म्हणून सांगावंसं वाटतं. "

मला कुणी भोळा सांब म्हटलेलं आवडत नाहीं. पण आतांपर्यंत अनेकांनीं अस्मादिकांची शिवाशीं तुलना करून घशांत ओतलेल्या उपदेशाचें कडू हलाहल निमुटपणें गिळण्याची मला संवय झाली आहे. मी गोखलेला म्हटलं, "तशी फिकीर करण्याचं कांहीं कारण नाहीं. मला वचकून असते ती."

मनांतल्या मनांत मी रूपा सितलानी आणि ज्या बाईला आपल्या घरची डाळ शिजवण्याचा गोखलेनें हक्क दिला होता ती त्याची बायको, यांची तुलना करीत होतों. वहिनी तशा ठीक होत्या—फक्त सांवळ्या, स्थूल आणि नाकीं डोळीं तेलकट वगैरे वगैरे. मला गोड पदार्थ आवडत नाहींत हें कळल्यावरहि दर वेळीं मंथरपणें माध-वऱ्या आवडत्या शिऱ्याची बशी माझ्यापुढें करीत आणि "भावोजी बरोबर तिखट लोणचं देऊं का?" हा प्रश्न विचारीत. त्या उलट रूपा—उंच, सडपातळ, गोरी रूपा, दाट भुऱ्या केसांची आणि हास्य सांडणाऱ्या डोळ्यांची रूपा, आज—चुकलों, आज नाहीं पण काल परवांपर्यंत—ऑफिसमध्यें माधवऱ्याच बरोबरीनें प्रमोशन मिळवीत होती, आणि पार्टिशन्स घालून केलेल्या कां होईना पण स्वतंत्र खोली-पर्यंत चढली होती.







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

ज्याची त्याची आवड त्या त्या व्यक्तीकडे. मला रूपा आवडत होती आणि माझ्यासारख्या एका सामान्य अबोल भिडस्त माणसांत तिला आवडण्याजोगं काय होतं हेंच मी समजूं शकत नव्हतों.

आम्हीं एकाच ऑफिसांत नोकरी करीत असलों, तरी आमच्या सबंध ऑफिसनें एक तीन मजली इमारत अडवली आहे. तेव्हां रूपा सितलानी नांवाची एक बाई आपल्यासारखीच या ऑफिसच्या हितासाटीं झटत असते, अथवा ऑफिस तिच्या हितासाठीं आहे—यापलिकडे मला तिची माहिती नव्हती. जातां येतां कधीं लिफ्टमध्यें दिसत असे. एकदां क्लबच्या निवडणुका जवळ आल्या तेव्हां स्वतः होऊन "तुमचं मत मला द्या हं" असं सांगून गेली, त्यावेळीं ध्यानांत आलं कीं श्रीमती सितलानी त्या ह्या.

नंतर मेट्रो सिनेमांत तिला पाहिल्याचं आठवतं. तिचा नेहमींचा ऑफिसचा वेष अगदीं साधा असे. कधीं डोळ्यांत भरला नव्हता कीं इतर मुलींत उठून दिसला नव्हता. हाताखालीं काम करणाऱ्या पोरींवर दरारा रहावा म्हणून तो ऑफिसचा सफेत पोशाख असे, हें तिनें मागून सांगितलं. सिनेमागृहांत तिच्या तलम, नटव्या वेषभूषेंत मीं तिला पटकन् ओळखूं शकलों नाहीं. तिच्या बरोबर आमच्या मोदीचो बायको, व इतर एकदोन स्त्रीपुरुष होते. मोदी हें आमच्या ऑफिसांतलं एक बडं प्रस्थ आहे. त्याच्या बायकोला मीं पाहून ओळखतों.

आपण होऊन त्याला सोडून रूपा सितलानी माझ्याकडे आली, आणि म्हणाली, "अरे वा, दीक्षित ! तुमच्या गळ्यांत बांधलीं का या चॅरिटी शोचीं तिकिटं ? मिसेस मोदींना ओळखतां कीं नाहीं तुम्हीं ? याना, तुमची ओळख करून देतें."

त्यावेळीं दुसरीं बडीं माणसं बरोबर असतांना माझ्याशीं मुद्दाम येऊन बोलण्याचं तिला काय प्रयोजन ? पण ती अगत्यानें आली, आणि मला तिच्याबद्दल आपुलकी वाटूं लागली.

तेव्हांच तिचं तें डोळ्यांतून फांकणारं हास्य माझ्या पहिल्यांदा ध्यानीं आलं, आणि तेव्हांपासून नेहमींच आवडत आलं आहे,—नव्हे—आवडत होतं......

पण तिच्याविषयीं गैरसमज करून घेणारीं माणसं बरीच होतीं. 'माधव गोखले एकटाच प्राणी नव्हता. आमच्या पेणच्या भागवत मास्तरांची मुलगी एस्. एस्. सी. झाली आणि नोकरीसाठीं मुंबईत येऊन राहिली. शॉर्टहॅन्ड, टायपिंग शिकली, शिवाय सकाळच्या कॉलेजला जाते. भागवत मास्तर म्हणाले, "बघा रामभाऊ आमच्या सरलेला कोठेंतरी चिकटवून द्या ! मोठे उपकार होतील." मीहि मग थोडाफार प्रयत्न केला. आणि कर्मधर्मसंयोगानें त्याचवेळीं आमच्या ऑफिसांत एक टेंपररी टायपिस्टची जागा रिकामी झाली होती, सरलेला तिथं लावतां आलं.

चांगली वीस एक वर्षांची ती मुलगी लहान नाहीं. एक दिवस घरीं येऊन बघतों तर आमच्या आईसमोर बसून रडते आहे. कां तर म्हणे वरिष्ठ ऑफिसर श्रीमती सितलानी यांनीं तिचा अपमान केला. कामांत चुका फार होतात म्हणून बोलल्या असत्या तर हरकत नव्हती. पण तिची पिशवी मुद्दाम उघडून चारचौघांसमोर "ऑफिसची स्टेशनरी तर लांबवत नाहीं ना यांतून ?" असं विचारून आंत तिची अभ्यासाचीं पुस्तकं आहेत ही खात्री करून घेतली. मला वाटतं, रूपानें या पोरीची थट्टा केली असणार. पण सरलेचा त्यांत फार मोठा अपमान झाला. आणि " काकू, मीं नोकरीला राहिलें ती चोऱ्या करायला काहो ?" असं म्हणून मला गोष्ट सांगतांना पुन्हां स्फुंदुन स्फुंदुन रडायला लागली.

आई तेव्हां म्हणाली, "हल्लीं नेहमीं नेहमीं तिचं नांव ऐकूं येतं. एकदां बघायला तरी आवडली असती ही सितलानी कीं फितलानी कशी दिसते ती."

आईचं म्हणणं माझ्या पथ्यावर पडलं. बरेच दिवसांपासून रूपाला एकदां घरीं आणायचं असं ठरवीत होतों. ऑफिसांतला तिचा दर्जा तिचं शिक्षण, तिच्या महत्त्वाच्या ठिकाणीं असलेल्या ओळखी, इत्यादींबद्दल आईला आधीं बरंचसं सांगून, सरलेच्या तक्रारीविषयीं चकार शब्द न काढण्याचं आश्वासन घेऊन नंतरच रूपाला मीं घरीं बोलावलं.

ती येऊन गेल्यानंतर तिच्याबद्दल आईनें उघड व्यक्त केलेलं मत असं—"जशा सिंधिणी असतात तशी आहे झालं. नाकीं डोळीं बरी आहे. बाकी आपण कशाला दुसऱ्यांच्या मुलींना नांवं ठेवायचीं ? मला थोडीच सून करून घ्यायची आहे ?"

रूपाचं आईबद्दल मत अधिक प्रांजळ आणि स्पष्टवक्तेपणाचा दोष घेणारं होतं. ती म्हणाली, "तुमची आई फार आवडली मला. कसा उंच धिप्पाड देह आहे तिचा—तुमच्याचसारखा ! माझी आई तिच्यापुढें एखाद्या नाजुक बाहुलीसारखी दिसेल."

आपल्या आईच्या उंचीला अथवा रुंदीला एका परक्या तरुणीनें नांव ठेवलेलं कोणत्या मुलाला रुचेल ? पण तिच्या आणि माझ्या आईनें जवळ जवळ येण्याची कल्पना तेवढी आवडली मला. शिवाय रूपा या वेळपर्यंत परकी वाटत नव्हती हें देखील खरंच.







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## -आपले संपूर्ण सामर्थ्य एकवटून प्रयत्न करूं या

**आपल्या जीवनासाठीं
पंचवार्षिक योजना
अत्यावश्यक आहे.**

पंचवार्षिक योजना यशस्वी करण्यासाठीं महाराष्ट्र राज्यांतील आपण सर्व लोकांनीं जात, धर्म, भाषा, प्रदेश अथवा आपलीं वैयक्तिक मतें यांचा विचार न करतां अंतःकरणपूर्वक व कसोशीचे प्रयत्न केले पाहिजेत.

भारताच्या व महाराष्ट्राच्या हितासाठीं आपण आपलें संपूर्ण सामर्थ्य एकवटून प्रयत्न करूं या.

## योजनेबरोबर विकास व प्रगति साधा

प्रकाशन संचालक महाराष्ट्र सरकार, मुं




अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कधीं आम्हीं सिनेमाला गेलों, कीं मी धटिंगण असूनहि गर्दीला बिचकून मागें उभा राही. रूपा आजुबाजूला नाजुक धक्क्यांची खैरात करीत खुशाल पुढें घुसून मिळतील त्या दराचीं तिकिटं हस्तगत करी. एखाद्या उंची हॉटेलांत खायला जावं—न मख्ख चेहऱ्याचे माझ्यांतून आरपार बघणारे वेटर्स रूपाच्या खुणेसरशीं लगबगीनें पुढें धांवत. अनोळखी लोकांशीं जेथें जेथें संबंध येतो, तेथें तेथें मी बावरतों आणि रूपाचं कौशल्य पाहून चकित होतों. माझा गोंधळ पाहून तिचें डोळे नेहमींसारखे हंसू लागले, कीं त्यांच्यावरची नजर काढून घेणं मला जमत नसे.

पण इतरांची कांहीं समजूत झाली असली तरी मीं तिला लग्नाचं वचन कधीं दिलं नव्हतं. आतां जगाला हें पटवणं मला फार कठीण जातं त्याला मीं काय करावं ? अगदीं कोर्टानं शपथेवर सांगावं लागलं, तरी मी म्हणेन, कीं अमुक दिवशीं आपण लग्न करूं या असं माझ्या तोंडून कधीं निघालं नाहीं. रूपा त्या प्रवासाला निघाली होती—तिच्या भावाची आमच्या लग्नाला संमति मिळवायला हें धडधडीत असत्य आहे. जरी समजा लग्न ठरल्याचं खरं असतं, तरी तें कळवायला मुद्दाम प्रवास करण्याचं काय कारण ? आणि तेंहि एकटीनें ? पुन्हां फर्स्टक्लासमधून ?

तो प्रवास रूपाला कसा भोंवला तें सगळं तपशीलवार वर्तमानपत्रांतून आलं आहे. इगतपुरीजवळ तिच्या डब्यांत एक माणूस घुसला, रूपानें त्याच्याशीं न घाबरतां झटापट कशी केली, त्यानें तिच्यावर सुऱ्याचे वार कसे केले, आणि तरी ती सांखळीला कशी लोंबकळली, तें सर्व छापून आलं होतं. रूपाचे फोटोहि आले असते, परंतु ते येऊं नयेत म्हणून धडपड करावी लागली. मला ठाऊक आहे, कारण त्या दुर्दैवी घटनेनंतर रूपाचा स्नेही म्हणून असलीं बरीच कामं माझ्या गळ्यांत पडलीं.

पण रूपाची चिकाटी खरोखर वाखाणण्याजोगी. मला वाटलं होतं ती नोकरीचा राजिनामा देईल, पण छट्! किती महिने तिनें हॉस्पिटलांत काढले आणि लहानमोठ्या किती शस्त्रक्रिया करून घेतल्या तें तिलाच ठाऊक. लांबलचक रजेनंतर अलिकडे बाई पुन्हां कामावर रुजू झाली. येथून तेथून तिच्यावर सहानुभूतीचा आणि अभिनंदनाचा वर्षाव होतो आहे. ती जीवंत राहिली म्हणून कुणी अभिनंदन करतात तर कुणी तिच्या असामान्य धैर्याबद्दल कौतुक करतात. अशावेळीं तीं हंसते, कुणी सहानुभूतीनें हळहळलं तरी ती हंसते. पूर्वीसारखेच तिचे लालबुंद ओंठ विलग होतात, उजवीकडनं वर जातात, पांढरे शुभ्र दांत दिसतात. बस्स...तितकंच. शस्त्रक्रियेंत एक डोळा काढून टाकावा लागला आहे, तरी ती हंसते. ती हंसते आणि मी रडतों.

कालच तिच्या सांगण्यावरून आमच्या नेहमींच्या ठिकाणीं मी जेवायला गेलों. नेहमींसारखे आम्हीं समोरासमोर बसलों. तिच्या पायांचा स्पर्श माझ्या पायांना होत होता, आणि एका क्षुल्लक कारणावरून पूर्वीच्याच मोकळेपणानें रूपा हंसूं लागली. माझ्याच्यानें बघवेना, पण ती खदखदून हंसत होती. जणुंकाय तिच्यासारख्या निरोगी, सुंदर तरुणीच्या छातीवर, पायावर, सुऱ्याच्या लांबलचक खुणा पसरणं ही एक सामान्य गोष्ट होती, आणि माणसाचा एक डोळा काढून टाकावं लागणं ही एक क्षुद्र घटना होती, हंसण्यासारखं अजुन जगांत पुष्कळ कांहीं ती पाहूं शकत होती. तिचें तें भेसूर हास्य बघून मी कोरड्या डोळ्यांनीं आवाज न करतां ऊर फाटल्यासारखा रडत होतों. कारण तिचा एक तपकिरी डोळा हंसतां हंसतां हालत होता. इंथून तिथें दृष्टिक्षेप टाकत होता. दुसरा कांचेचा-मुबईच्या व्रणाखालीं खोल रुतून बसलेला, निश्चल चकणेपणानें माझ्याकडे एकटक बघत होता...कोण म्हणतं मी रूपाशीं लग्न करणार होतों म्हणून ? .

रोज सकाळीं उठतांच डोळे घट्ट मिटून तिच्या हंसण्याचा आवाज तेवढा ऐकूं ? छे, छे ! या नाहीं, त्या पूर्वीच्याहि नाहीं, वेछूट अमर्याद हंसणाऱ्या रूपा सितलानीशीं लग्न करायचा माझा कधीं विचारच नव्हता. ● ● ●

(पान २२ वरून)

विझवी कामज्वलन ॥
प्रभु परि झालें न चरम धातुस्खलन॥मो॥
तरुण तरुणींशीं एकत्र ।
घडतां एकांती वसती मात्र ॥
मन्मथ बाणें भंगे गात्र ।
ऐसे चरित्र मदनाचें ॥
तेथ लिंगसंघट्टयोगें ।
गोपी भोगितां सप्रेम रंगें ॥
ज्याचें ब्रह्मचर्य न भंगे ।
न वचे अनंगे जिंकिला ॥
परमधातु म्हणजे शुक्र ।
न द्रवे रमतां वनिता चक्र ।
नवनीत न लभे मथितां तक्र ।
तैसा अवक्र आत्मरत ॥
कंदर्प क्रीडा समरीं ।
कृष्ण अजिंक्य निर्विकारी ॥
तयासी म्हणती जे व्यभिचारी ।
ते संसारी भवरुग्ण ॥

विषयासक्त जे बहिर्मुख ।
तेही करावया श्रवणोन्मुख ॥
शृंगार रास रहस्यप्रमुख ।
दावी अनेक रसलीला ॥
म्हणाल मनुष्यवेशें कृष्णें ।
जीं जीं केलीं क्रियाचरणें ॥
ती तीं मानवां स्पृहायमाणें ।
तरी हें झणें मानाला ॥
केवळ पूतना राक्षसी ।
कृष्णें घोंटली विषा सरिसी
येरां मानवां न जिरे माशी ।
हें मानसी उमजावें ॥ कृ ॥
ऐसें आपणही करूं म्हणवुनी ।
जो कां अपेक्षा धरी ॥
थोडेसें विष तो गळां न मिरवी
कां हो शिवाचे परी ॥ वा ॥

\+ + +

असो, पंडित कवींच्याच शब्दांत त्यानींच रंगविलेल्या शृंगार रसाचा अंशमात्र परिचय आपण करून घेतला. या साऱ्याच कवींनीं या शृंगार वर्णनाला भागवताचा आधार दिला आहे. भागवतांतील मूळ कल्पनांचा संक्षेप विस्तार प्रत्येकानें आपल्या कल्पनेप्रमाणें केला आहे. इथें कथेचें सूत्र सांगतांना कृष्णदयार्णव, श्रीधर, वामन आणि मोरोपंत यांना मोजून सारखेंच स्थान दिलेलें नाहीं. कल्पना काव्यात्मतेनें आणि रसाळपणें ज्यानें अधिक वर्णिली आहे त्याला जास्त अवसर मिळाला आहे. मोरोपंतांचा यांत शेवट नंबर लागला त्याला नाइलाज. कृत्रिम यमकें, दुर्गम वृत्त, क्लिष्ट भाषा आणि ताणलेल्या कल्पना याच्या दुर्भेद्य भरांचा दीर्घोद्योगानें छेद घ्यावा तेव्हां कोठें रसाचा बिंदुमात्र लाभ व्हावयाचा !

अंधश्रद्धा विरहीत मनाला ही रासक्रीडा वाचून अनेक प्रश्न सुचतात. त्यांचीं उत्तरें शोधावयाचीं तर आपणांस भागवताची कास धरावयास हवी. ● ●


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# रंगचित्र

केशव मेश्राम

काळपरवां तर श्रावण चोर-पावलांनी आला होता. पावसाची सर झाडाचीं पानें निथळवीत आणि पांखरांच्या पंखांना गुदगुल्या करीत निघून गेली होती. एरवी पिसाटासारखा सोसाटणारा वारा सुतकानंतर नादान तारुण्यास सखोल-तेचा अर्थ कळल्यासारखा आंजारीत-गोंजारीत जात होता. आकाशाला रंग होता, पण त्याला निश्चित नांव देताच येणार नाहीं. त्यापेक्षां अर्थ अगदीच सरळ होता. सखोल आणि गूढ. अतीतानें अर्पिल्यासारखा...पांच साडेपांचाचा प्रभातकाल. गिरण्यांचे भोंगे पूजासमातीनंतरच्या शंखांना आवाहन देत होते. अर्धवट निद्रेच्या अन् चिंतांच्या चक्रां-तून उरलेल्या सौख्यास हा नाद कातरीत जातो. विचार जडावतो व क्षणांतच त्याची राख होते. मन हलकं होतं. संमिश्र फुलांचा गंध शहाऱ्यांना फुंकर मारीत सरसरत असतो. हें सारें डोळ्यांत गोळा करतांना मी शिल्प होऊन स्तब्ध असतो.

धुक्यांतून झिरपत दोन प्रखर प्रकाशझोत धूमकेतूच्या गतीनें जातात. कानांना नकोशीं वाटणारी घरघर तीही पुसट झाली होती. हरवलेल्या मनास असण्याचा चिमटा काढ-णाऱ्या विमानाचा मला मनस्वी राग आला. पण प्रकाशाच्या धारांनी माझें उघडें अंग संवेदनांनी चिंबून टाकले. रातकिड्यांची स्वरावलि चालूंच होती. दूधवाल्यांची ये-जा लगबगत होती. स्वरांत मार्दव आणण्याचा प्रयत्न पिचून जाऊन पाववाल्याची ललकारी अधिकच चमत्कारिक वाटत होती. सडके-वरून जलतुषारांचीं नक्षी रेखीत मधूनच एकादी मोटार सुळसुळत निघून जात होती. कोंबड्यांच्या पंखउबेत मान रुतवीत कोंबडे आपल्या पौरुषाची जाहिरात करीत होते. मन अंतर्मुख झालं होतं...त्यांतहि कुत्रें कां आक्रंदन करतें तें कळत नव्हतं. दुसऱ्या दिवशीं कत्तलखान्यांत चेंदामेंदा होणाऱ्या शेळ्या-मेंढ्या आज अजून कां मुसमुसतात याचं उत्तर मिळतं नव्हतं. कुठल्या तरी अर्भकांच्या रडण्याचा आवाज; आर्त स्वर-जाल होऊन मला गुरफटीत होता. त्यांत अड-कलेलें वेडें पांखरूं पंख झटकीत गगनापार होऊं पहात होतें. पंखांचीं फडफड चालूंच होतीं. पाण्याचें थेंब ओलेत्या झाडांवरून दुखावल्या-गत झडत होते. जमिनीस ओलावा मिळत होता. खाऱ्या वाऱ्याची एक कलंदर लहर येते आणि पुन्हा छातींत श्वास कोंडून मी घुमूं लागतो.

...बाजूचा निशिगंध अबोल उभा कां ? तिरप्या मार्गानें फोफावण्याचा त्यास मोह कां व्हावा ?...एक मुंगळा सावधीतपणें खाली उतरतो आहे. तो एकच कप्पा; अत्तराच्या रिकाम्या बाटलीचा. गंधाला मिठी मारून सौख्य-धुंद असणारा...पूजेचं मंगल साहित्य घेऊन तीं आली होती. नंदादीपांतून तेल नुसतं ओथंबत होतं. पण गाभाऱ्याच्या परि-घांत मी वाटपारखा झालो. ज्वाला मागणाऱ्या दीपाला माझ्याजवळ अग्नि नव्हता. ती वात कधीच पेटवूं शकलो नाहीं. ओसाडल्या डोळ्यांत सारं कांहीं कोंबून ती परत फिरली. अंधारलेल्या मनांत काळोखाचें पसायदान झालें !! आतां तें साहित्य, तो नंदादीप, कोठेंतरी थरथरत असेल. कच्च्याबच्च्यांच्या चेंगटांत, संथ तेवूं पाहणारी ज्योत फडफडत असेल...माझें हातच पाषाणाचे आहेत ! ...बाजूचा निशिगंध अबोल उभा आहे.

...आसमंतांत गडदपणा भारलेला आहे. रातकिड्यांचा अखंड वेदनहुंकार, कुत्र्यांची आर्त साद, अर्भकाच्या रडण्याचें स्वर...ह्या साऱ्यांत मी जखडला गेलो आहे.

...ठराविक गल्लीच्या तोंडाशीं भेटणारे महारोगी; झडलेल्या-झडत असलेल्या त्वचे-नेच माझ्याशीं सलगी करतात. जीवंतपणींचें उभें मरण...याचना करतांना, विकल झालेलें मी पहात जातो. महिन्याचा शेवटचा आठवडा म्हणून एक नया पैसाहि मी त्यांना दिलेला नसतो. पण त्याच दुपारीं खाल्लेलं आम्लेट. त्यांतील जीव पोटांत चोंचे मारतो आहे. अधिक्षेपाची लय टिकविण्यासाठीं रातकिडे वेदनराग आळवतात.

...मजा मारतो आहेस वेड्या !! गेल्या दोनचार महिन्यांत दूरगांवी शेतांत रणरणत्या उन्हांत ठेचाळणाऱ्या अशिक्षित जन्मदात्यांना



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

एक पत्र तरी लिहिलंस कां ? सख्ख्या बहिणीच्या जीवघेण्या दुखण्यासाठीं त्यांना पैशांची गरज होती. पुस्तकें विकत घ्यायची आहेत असंच लिहिलं आहेस ना ? वेतलीत ? कुठं...? माथेरानच्या वनराजींत छेलछबेल्यांच्या मेळाव्यांत कीं, झगमगणाऱ्या कॉफीगृहांत ? कुत्रा आहेस तूं ! स्वतःच्याच शेपटीचा जीव तोडून पाठलाग करणारा...आणि कांपरें भरवणाऱ्या वाऱ्यांतहि घशाला कोरड पडते. कुत्र्यांचीं आर्तसाद घोंघावत राहते.

...कितींच्या उंबरठ्यांवर तूं पाऊल ठेवलेंस. अपुऱ्या जागेंतहि नवोढाच्या विल्वरांनी तुझे हंसून स्वागत केलें. तुझ्यावर विसंबून त्यांनीं तुझ्या डोळ्यादेखत पत्नीशीं सलगी केली. मैत्रीची किंमत होती. आणि त्या तशा मित्रांना आणि ज्यांना आदरानें 'वहिनी!' म्हणून तूंच हांक मारलीस त्यांना ऐन बाळंतपणांत सोडून देऊन खुशाल निघून गेलास, त्याचाच हा सूड असेल. अर्भकें किंचाळत आहेत. अजून पूर्व अंधारांत आहे. आसमंत गर्द आहे; खिन्न अन् सुतकी !

पडजांतून एकदम तार तुटावी तसं पुन्हां शरीरास व मनास चटका बसतो. कर्कश करीत जाणारी गाडीची धडधड रोमांचावर चालून येते. पंख खेचतांनाची विलक्षण ओढाताण होते. हातांना घाम सुटतो. उघड्या अंगावर कांटा फुलारतो...तो श्रावणाच्या पायरवाचा पहिलाच दिवस. एका हातावर, अवघडलेल्या पायांवर अर्धवट आंत-बाहेर चेंगटणारें शरीर सावरीत आग्यामोहळ दिसणाऱ्या गाडीला लगडणारे असंख्य प्राणी. छोट्या स्टेशनांना वाकुल्या दाखवीत तें धूड सुंसाटत होतं. एका मधल्या ठिकाणीं तें थबकतं आणि कुणीतरी 'पाकिट मारा!' म्हणून किंचाळतो. माझ्या डोळ्यापुढून झटकन् वळणारा हात मी पकडून ठेवला असतो. हार्दिक अभिनंदनाचं गुलाबपाणी माझ्यावर शिंपडलं गेलं होतं आणि ज्याला मी पकडलेला असतो त्याच्यावर ?...रस्त्यासारखा त्याला चेचलेला असतो. गाडी निघण्याच्या आधी प्लॅटफॉर्मवर तो ढकलला गेला होता. गाडीच्या गतीत गर्दीच्या गप्पा रंगतात. मी मात्र स्पर्श झालेल्या गांडुळासारखा आंकसून जातो. तो मेदरलेला, विकल चेहरा. हाडांनीं बोलणारें सावळें दारिद्य अन् डोळ्यांतून निसटणारी असह्य व्यसनाधीनता...कां...कां...कां ? माझ्या प्रश्नाचें भूत काळजांत नखें रुतवितें आणि माझी कात झडायला लागते. सारं खद्खदल्यासारखं होतं...कावळे मात्र काव काव करीत असतात. श्रावणाच्या प्रभातकालीं !

...ही वेताळसेना अगदी नकोशी होते, तरीहि एक समंध शिरतोंच. "माणसं, नुस्ती हवेवर जगली असती; तर बरं झालं असतं. नव्हं ?" हा प्रश्न ऐकताच मी पुस्तकांतून मान उपसून काढली असते. एस. टी. च्या गाडीतला तो खेडुतांचा संवाद. जाडेभरडे कळकट अंगरखे आणि धग पचवून रापलेला खडबडीत चेहरा...बोलणारा आणि तसलाच पण सुन्न अन् व्याकुळ झालेला दुसरा. मी मात्र हंसलों होतो. स्वतःशीच पण त्यांना ऐकूं जाईल असे. आंतां भ्रमन्नीत आठवडे दुमडताहेत. हसण्याचा अर्थ आणि मूकतेचे वजन फार चांगलें समजलें आहे. प्रहार करणारा तळवा अप्रकाचाहि असूं शकतो. ज्या जिद्दीनें जगाला शिव्याशाप दिले तेवढ्याच विकलतेने याचना करण्याचे शिकलो आहे. माती थापली आहे; कपाळावर माती....आकारणारी....थंडगार ओली ! माती...निखळणारी...रखरखीत कोरडी ! !

अंधुक प्रकाश आकाशभर वरंघळत जातो. दुधाच्या बाटल्या घेऊन लगबगीनें दूधकेंद्राकडे धांवत-जाणारें वाढलेलें असतात. माउलीच्या स्पर्शासारखा वारा सुटतो. ढग घट्ट होतात आणि पुन्हां सर ओघळते. असह्य होऊन कोसळणाऱ्या अश्रुंची तिला झिलई चढलेली असते.

मी स्वतःला अनिच्छेनेंच ओढून घेतो. आभाळाला अर्थाचा रंग आलेला असतो. स्वतःवरच डोळे त्रयस्ताच्या शंकेनें टकमकत असतात. पत्र्यांवर पागोळ्या टपटपतात. सोसाट्याच्या चालीनें मी गर्दीत मिसळतो. कणांना पूर आलेला आहे. ठिपका वाट मिळेल तसा वाहत जातो आहे. देहाचें यंत्र खडखडतें आहे. संवयीच्या स्पंजांत नेहमींचेंच घडते आहे. शिल्प ताठ उभे आहे. निर्विकारतेचे रंग मनाच्या चहूंबाजूंनीं धांवत जातात. उन्हांत पाऊस कोसळतो. पांखराच्या उघड्या चोंचीत हवासा थेंब पडतो...एकच आणि अखेरचा.


# डॉ क्ट र्स

डेन-टॉनिक व ऑन्टान्सिल
(टीथिंग पिल्स) (टॉन्सिलसवर)

विश्वासानें व मोठ्या कौतुकानें वापरण्यास सांगतात.
कारण त्यापासून होणारे फायदे अनुभवास येतात.

बाराक्षार व होमिओ औषधे माफक दरांत मिळतात

## होमिओ लॅबोरेटरी

राममोहन हायस्कूलजवळ, १७८, चर्नी रोड, गिरगांव, मुंबई ४.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

अनुक्रमणिका



# दोरायराजन्

*सरकारीं कारभार म्हणजे आंधळं दळतं आणि कुत्रं पीठ खातं अशांतलाच प्रकार. युद्धकाळांत अशीं कुत्रीं फार सोकावलीं होतीं. मद्रासच्या गव्हर्नरचीं सहीं गिरवून एकानें अनन्वित प्रकार केले त्याचा हा वृत्तांत—*

"धाडस आणि त्या मागोमाग कृति करण्याची ताकद असली कीं विजय हा ठेवलेलाच ! भ्याड माणमाला त्याची आशाच नको !" असा संदेश पंतप्रधान जवाहरलाल नेहरूंनी एकदां युवकांना दिला होता.

नेहरूंना कल्पनाहि नसेल कीं आपला हा संदेश अंमलांत आणणारा दोरायराजन्सारखा एक हिकमती आणि धूर्त तरुण असेल !

दोरायराजन् म्हणजे कोणत्याहि सोनेरी टोळीचा म्होरक्या व्हायला लायक असा धाडसी इसम. त्या काळांत युद्ध जोरांत होतें आणि त्यामुळें कोणत्याहि धंद्याला तेजी होती. पैसा मुबलक होता, लोकांची जागरूकता ढिली झाली होती आणि थोडक्या श्रमांत दौलत जमा करतां येत होती. दोरायराजन्सारख्या तीव्र बुद्धीच्या गुन्हेगारानें हा जमाना ओळखला. आवर्तांभोंवतीं वावरणारीं अनेक माणसं अगदी साधी असतात—इतकीं, की कुणीहि त्यांच्या डोळ्यांत धूळ टाकावी. थोडीशी अजीजी केली, करुणा भाकली कीं अशीं माणसं आपला खिसा रिकामा करायला अनेक वेळां तयार असतात हें त्यानं हेरलं होतं. आणि युद्धकाळांत सरकारीं कंत्राटं मिळविण्यासाठीं जो तो उत्सुक. या परिस्थितीचा दोरायराजननें फायदा घेण्याचं ठरवलं. मूर्खांना त्यांच्या मूर्खपणाचें प्रायश्चित्त दिलेंच पाहिजे असं त्यांचं मत होतं.

दोरायराजननें आपल्या कामाला सुरवात केली. त्यानें पांच पत्रें छापून घेतलीं. त्यांत त्याच्या नांवाचा उल्लेख आर. विश्वनाथन्, डायरेक्टर गव्हर्मेंट डिपार्टमेंट असा केला होता. हीं पत्रें मद्रासच्या एका बड्या मोटार बस सर्विस कंपनीच्या संचालकाला उद्देशून लिहिलीं होतीं. या पत्रांचा मतितार्थ असा कीं म्हैसूर सरकारशीं मद्रास राज्यानें असा करार केला आहे कीं, म्हैसूर सरकारनें मद्रास राज्यांतील सहा निवडक मोटार बस कंपन्यांना टायर्स पुरवावेत. मात्र अट अशी कीं हें पत्र मिळतांच त्या त्या बस सर्विसच्या चालकांनीं आर विश्वनाथन् डायरेक्टर गव्हर्मेंट डिपार्टमेंट मद्रास राज्य यांना ११००.रु. चा एक बेअरर चेक पाठवावा आणि उरलेले ९०० रुपये टायर हातीं आल्यावर द्यावेत. हें पत्र मद्रासच्या सरकारी छापखान्यांत छापल्याचा आभास निर्माण करण्यांत आला होता. वर सरकारी राज्यमुद्रा आणि पत्ता, डायरेक्टर गव्हर्न्मेन्ट डिपार्टमेंट, नं. १ ओल्ड पुअर हाऊस रोड, बंगलोर कॅन्टोनमेंट. पत्राखालीं त्यावेळचे मद्रासचे गव्हर्नर सर आर्थर होप यांची सही. दुसऱ्या पत्रांत त्या कंपन्यांना

—चंद्रसेन







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

मोटार टायर्स मद्रास येथें पुरविण्याचें आश्वासन, तिसऱ्या पत्रांत हे टायर्स मद्रास येथें पुरविण्याबाबच्या शर्ती, चौथ्या पत्रांत टायर सप्लाईंग डिपार्टमेंटचा प्रत्येकीं १५० रु. प्रमाणें १६ टायर्स पुरविण्याबाबतचा 'इन्व्हाईस' आणि पांचव्या पत्रांत, सरकारी सचिवालयांतून टायर नेण्याबाबतचें परमिट.

अशा पांच पत्रांचा दोरायराजननें व्यूह रचला. त्या काळांत मोटारीचे टायर्स मिळणें आणि मिळवणें फारच अवघड झालें होतें. मोटार मालक आणि विशेषतः मोठमोठ्या बसकंपन्यांच्या चालकांचा जीव तर अगदींच मेटाकुटीला आला होता. त्यामुळें मद्रास राज्यांतील सहा निवडक बस कंपन्यामध्यें आपली निवड करून आपल्याला टायर्स पुरविण्याची मेहेरबानी खुद्द गव्हर्नरनें करावी ही घटनाच कुणालाहि हुरळून टाकणारी होती. त्यामुळें त्या विचाऱ्यानें एका क्षणाचाहि विलंब न लावतां मि. विश्वनाथन् यांना १५०० रु. चा एक बेअरर चेक पाठवला. दोरायराजन्नें १५०० रु. मिळाल्याचें तारेनें कळविलें आणि उरलेले ९०० रु. तातडतोब पाठविण्याची विनंति केली. या तारेनुसार त्यानें ९०० रु. पाठवले आणि ठरल्या दिवशीं तो सेक्रेटरीएटमध्यें टायर्स घेण्यासाठीं गेला तर त्याला दरवाजावरचे पहारेकरी आंत सोडीनात. शेवटीं महत्प्रसानें त्यानें आंत प्रवेश मिळविला तेव्हां मद्रास सरकारची अशी कांहीं योजना मुळींच नाहीं आणि कुणी तरी ही बनवेगिरी केलीय, असें कळलें. मध्यंतरीच्या काळांत ते चेक भामट्यानें केव्हांच वटवले होते. आणि तो बंगलोरहून केव्हांच पसार झाला होता.

दोरायराजनचा हा डाव यशस्वी झाला. आणि त्यामुळें त्यानें याहिपेक्षां धाडसी डाव खेळायचं ठरवलं. त्यानें एका काराईकुडी येथील जवाहिऱ्याला पत्र पाठवलें. पत्र असें कीं सी. नारायण स्वामी चेट्टी, सेक्रेटरी टू गव्हर्नमेंट यांना ५००० रु. पाठविले तर निझामच्या वाड्यांतील ६०००० रु. किंमतीचे हिरे विकण्यासाठीं मिळतील. काराईकुडी येथील हा जवाहिऱ्या मद्रासच्या बसमालकापेक्षां अधिक धूर्त होता. त्यानें गव्हर्नरच्या खाजगी चिटणीसाला पत्र लिहून विचारलें कीं अशा प्रकारचा व्यवहार करण्याचा सरकारचा खरोखरच इरादा आहे कीं काय? त्यावर मद्रास सरकारने त्याला कळविलें कीं सरकारनें अशा प्रकारचा व्यवहार करण्याचें कधींच ठरविलें नव्हतें. मध्यंतरांत नारायणस्वामी चेट्टीकडून त्याला तार आली कीं हिऱ्याच्या व्यवहाराबाबत त्यानें पाठविलेलें पत्र मिळालें कीं नाहीं. त्यावर त्या जवाहिऱ्यानें आपण सरकारलाच या संबंधीं विचारलें असें कळविलें.

हें पत्र मिळतांच हा हिऱ्याचा व्यवहार एकाएकीं थंडावला.

यानंतर थोड्याच काळांत मद्रास सरकारनें छापलेलीं कांहीं पत्रकें एका तंबाखूच्या धनाढ्य व्यापाऱ्याला पाठविण्यांत आलीं. या पत्रकांत "म्हैसूर सिल्क" विकण्याची एक आकर्षक योजना मांडण्यांत आली होती. या व्यापाऱ्याचा असा समज करून देण्यांत आला होता कीं मद्रास सरकारची हें म्हैसूर सिल्क विकण्याची सारी जिम्मेदारी त्याच्यावरच सोपवायची तीव्र इच्छा आहे. सरकारची ही मेहरबानगी पाहून हा व्यापारी खुलला. हें पत्रक O. H. I. G. S. चा शिक्का असलेल्या पाकिटांतून पाठविण्यांत आलें होतें. वर खरे सर्विस स्टँप लावण्यांत आले होते. आमच्या तंबाखूच्या व्यापाऱ्यानें ७५० रु. चा बँकेचा ड्राफ्ट सरकारी डायरेक्टरला त्यांच्या मदुराई कँपवर पाठवला आणि तिकडे तो वटविण्यांतहि आला. त्यानंतर स्वारी सरकारी रेशीम ताब्यांत घ्यायला गेली तेव्हां त्याला कळलं कीं, आपण ७५० रु. ला नागवले गेलों आहोंत.

यानंतरची पाळी सालेम येथील एका स्टुडियो मालकाची आणि सिने दिग्दर्शकाची! म्हणे मुंबई सरकारनें लेस्ली हॉवर्ड या ख्यातनाम नटाच्या साहाय्यानें 'नेल्सन' नांवाची फिल्म तयार केली. आणि या चित्रपटाचे तामीळनाडमधील विक्रीचे हक्क आमचा हा मोगले आझम दोरायराजन सालेमच्या स्टुडियो-मालकाला द्यायला तयार झाला. अर्थात् मुंबई गव्हर्नरच्या नांवें! मात्र यासाठीं फक्त ५००० रु. चा ड्राफ्ट पाठवायचा. त्याला 'नेल्सन' चित्रपटाची माहिती देणारी एक पुस्तिकाहि पाठविण्यांत आली. याशिवाय आणखी एका चित्रपट वितरकाचें पत्र कीं, आपणहि आपल्या विभागासाठीं पांच हजार रुपये देऊन 'नेल्सन' चे हक्क विकत घेतले. पण या युक्त्याप्रयुक्त्यांचा त्या डायरेक्टरच्या मनावर मुळींच परिणाम झाला नाहीं. त्यामुळें दोरायराजननें त्याला कळवून टाकलें कीं सरकारनें त्याचें नांव काळ्या यादींत जमा केलें आहे.

पण सालेमच्या प्रकरणाचा सुगावा सी. आय. डी. नां लागला. यामागें एकादी धूर्त व्यक्ति अगर एकादी सोनेरी टोळी असावी असा त्यांचा संशय. पोलिसांनीं या पत्रव्यवहाराची कसून तपासणी केली तेव्हां त्यांनीं खालील निष्कर्ष काढले.

१ गुन्हेगारानें एका हँडप्रेसच्या मदतीनें हें छपाईकाम केलें आहे.

२ त्याच्याजवळ सर्विस स्टँपचा भरपूर सांठा असावा.

३ त्याचे इंग्रजी कच्चे आहे.

४ आणि तो वारंवार आपल्या जागा बदलतोय.

दक्षिण भारतांतील त्यानें ज्या ज्या ठिकाणीं वरील सर्व चेक वटवले त्या ठिकाणांचा एक नकाशा काढण्यांत आला. पत्रांच्या पाकिटांवरून असें सिद्ध झालें कीं, तीं पत्रें मेल गाड्यांत टाकण्यांत आलीं. पत्रांच्या तारखांवरून त्या त्या दिवशींच्या मेल गाड्यांतील सॉर्टर लोकांची जबानी घेण्यांत आली. त्यावरून असें सिद्ध झालें कीं हीं पत्रें मद्रास-तिरुचापल्ली या मार्गा-



आणखी एक रेखा-टण

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

वर कुडालोर व मायावरम् या स्टेशनांवर टाकलीं गेलीं. तपास करणाऱ्या अधिकाऱ्याला रेल्वेनें बराच प्रवास करावा लागला. सहज त्याच्या ध्यानीं एक गोष्ट आली कीं गुन्हेगारानें जीं टोपण नांवें धारण केलीं होतीं तीं रेल्वे टाईम टेबलमध्यें प्रकाशित केलेल्या रेल्वे अधिकाऱ्यांची आणि रेल्वे सल्लागार मंडळांतील सदस्यांचीच होती. तो ज्या हॉटेलमध्यें राहिला त्या हॉटेलच्या रेल्वे टाईमटेबलांत जाहिराती होत्या. पोलिसांनीं सर्वत्र कसून तपास केला पण आरोपीचं नीट वर्णन सांगणारा कुणी भेटेना. उलट अनेक वेळां भलत्याच इसमाला अटक करण्यापर्यंत पोलिसांची मजल गेली.

पण पोलिसांचं सुदैव चांगलं. पोस्टमन आणि बँका या भानगडींत पडण्यांत अर्थ नाहीं असं म्हणून दोरायराजन्नें सुगंधी सुपारी फर्मला एक पत्र पाठविलें. त्या पत्राचा आशय असा कीं १८०० रु.च्या सुगंधी सुपाऱ्या सरकारी कॉंट्रॅक्टरला पाठवाव्यात. या परदेशी लढाईवर असणाऱ्या आपल्या नौजवानांना पाठवायच्या आहेत. त्या दिवसांत अशा प्रकारें सैनिकांना सुखसोयीच्या वस्तू पाठविण्याची प्रथाच होती. त्यामुळें अशा प्रकारची संधि आपल्याला मिळत असपाहून फर्मच्या मालकाला धन्य धन्य झालं. आणि विशेष हें कीं खुद्द गव्हर्नरनें स्वदस्तुर ही विनंति केली होती. आपल्याला रावबहाद्दुर हा किताब मिळणार या खात्रीनें विचाऱ्यानें इग्मोर रेल्वे स्टेशनवर पार्सलं पाठविलीं, आणि मागोमाग रेल्वे रिसीटहि पाठविली. पण दुसरें दिवशीं फर्मचा ऑडिटरहि तिथं दाखल झाला. कारण गव्हर्नरची सही 'आर्थर होप' अशी असण्याऐवजी 'सर आर्थर होप' अशी केली होती आणि त्यामुळें त्याचा संशय दुणावला. त्यानें लागलीच जवळच्या पोलिस स्टेशनला वर्दी दिली. तात्कालीन मद्रासला एक पोलिस इन्स्पेक्टर पाठविण्यांत आला व सेंट्रल रेल्वे स्टेशनवर 'रेल्वे रिसिट' न्यायला येणाऱ्या इसमाला पकडण्याकरितां व्यूह रचला. थोड्याच वेळांत एक इसम ती रेल्वे रिसिट न्यायला आलेला असतांना पोलिसांनीं त्याला बेसावध असतां अटक केली.

पण इग्मोरच्या पोलिसांनीं ही संधि वाया घालवली. रेल्वे रिसीट घ्यायला आलेल्या इसमाच्या १५ दिवसाच्या रिमांडची मुदत संपत आलेली असतांना दोरायराजनचा तपास करणाऱ्या अधिकाऱ्यास ह्या अटकेची वार्ता कळविण्यांत आली. या पंधरा दिवसांत पोलिसांना त्याच्यावर कोणताच गुन्हा शाबीत करतां आला नाहीं.

अटक केलेल्या इसमानें आपण निरपराधी आहोंत असें केविलवाण्या चेहऱ्यानें सांगितलें. माझं नांव दोरायस्वामी असें त्यानें आग्रहपूर्वक सांगितलें. आपण लक्ष्मीकांतम् नांवाच्या एका इसमाचे नोकर आहोंत आणि त्याच्या सांगण्यावरून हें पत्र नेण्याकरतां आपण आलों — यापलीकडे आपल्याला कसलीच माहिती नाहीं असें त्यानें विनवून सांगितलें. हें पत्र कशाबद्दल आहे हें आपल्यास मुळींच ठाऊक नव्हतें असेंहि त्यानें सांगितलें.

या अटकेनंतर दोनच दिवसांनीं लक्ष्मीकांतम्चा कुणीतरी खून केला. या खुनामुळें कशाचाच कशाला पत्ता लागेना.

( पान ४१ वर पहा )




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



# सुनंदा केक करते

त्या दिवशीं दुपारीं सुनंदा (माझी बायको) माझ्या ऑफिसमध्यें आली तेव्हां तिच्या हातांत कसलें तरी पुडकें होतें. 'त्यांत काय आहे?' असें मी विचारण्यापूर्वीच 'यांत काय असेल ओळखा पाहूं' असें तिनेंच आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें मला विचारलें. अर्थात् मला तें ओळखतां येणार नाहीं हें आम्हां दोघांनाहि चांगलें ठाऊक होतें. शेवटीं नेहमींप्रमाणें मीं हरल्याचें कबूल केल्यावर त्यांत केक बनविण्याचें भांडें असल्याचें तिनें मला सांगितलें.

त्याबद्दल तिनें केलेला खुलासा असा. थोड्या वेळापूर्वी सहज एका मैत्रिणीकडे बसावयास गेली होती. त्या मैत्रिणीनें कुठल्यातरी मासिकाच्या गृहिणी विशेषांकांत 'कोंड्यापासून केक कसे बनवावे' याबद्दल छापून आलेली माहिती वाचली होती. ती तिनें सुनंदाला सांगितली होती. तिनें मग माझ्या ऑफिसमध्यें येतांना वाटेंतच असलेल्या एका दुकानांतून तें भांडें खरेदी केलें होतें.

ही बातमी ऐकून मला कमालीचा आनंद झाला. आतां रोज सकाळीं चहाबरोबर मला खुसखुशीत केक खावयास मिळणार होता. टेबलावर असलेली माझी साहेबी टोपी हवेंत उडवून 'ए मेरी टोपी' हें कुठल्याशा सिनेमांतील गाणें म्हणत मीं खोलीभर नाचूं लागलों. 'हा काय मेला चावटपणा!' सुनंदा म्हणाली. यांत चावटपणा काय झाला हें मला समजलें नाहीं. फार तर हा आचरटपणा होऊं शकला असता. पण मी असा आचरटपणा केला म्हणजे सुनंदा नेहमीं त्याला चावटपणा म्हणते. या बाबतींत एकदोन वेळां तिच्याशीं वाद घालण्याचा मी प्रयत्न केला होता. हल्लीं मी तसें कांहीं करीत नाहीं. मीं तावडतोब तो चावटपणा थांबवला.

'आतां मी काय म्हणते तें ऐकून ठेवा नीट' ती पुढें म्हणाली. 'चार मोठे चमचे मैदा, दोन चमचे साखर, कपभर दूध, अर्धा चमचा खायचा सोडा, चिमूटभर मीठ आणि मूठभर गव्हाचा कोंडा समजलं? नीट लक्षांत ठेवा. नाहींतर बावळटासारखे विसरून जाल आणि मग मी उद्यां विसरून गेल्यावर सगळी पंचाईत होईल.' मैदा, साखर आणि दूध भरपूर वापरून केवळ मूठभर कोंडा वापरला असतां तें कोंड्याचे केक कसे होऊं शकतात हें मला समजलें नाहीं. पण मी कांहीं बोललों नाहीं. (कां तें तुम्हीं ओळखलंच असेल) ती यादी लक्षांत ठेवण्याचें कबूल केल्यावर सुनंदा निघून गेली आणि मी आपल्या कामाला लागलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सुनंदा केक करण्याच्या तयारीस लागली. तिनें पदर कमरेभोंवतीं घट्ट बांधून घेतला होता. चुलीजवळ बराच वेळ बसून राहिल्यामुळें ती अगदीं घामाघूम होऊन गेली होती. बऱ्याच वेळाच्या खटपटीनंतर केक तयार झाला असल्याचें तिनें सांगितलें. मात्र आम्हीं चहा प्यावयास बसलों तेव्हां टेबलावर केक कुठेंच दिसेना. एका ताटलींत एक वीट मात्र ठेवलेली होती.

'काय ग, केक कुठें आहे?' मीं विचारलें. 'आणि ही वीट कशाला इकडे ठेवली आहे?'

सुनंदा रागावून म्हणाली, 'हा काय मेला चावटपणा! वीट आहे का ती? केकच आहे तो मीं केलेला.'

मीं तो 'केक' उचलून पाहिला. तो विटेपेक्षांहि जास्त जड आणि जास्त टणक होता. तो कापतांना आमच्या चाकूची आणि सुरीची धार बोथट झाली, करवतीचे कांहीं दाते तुटले आणि वरवंटा त्यावर जोरानें मारल्यामुळें फुटला. शेवटीं मीं तो बत्त्यानें ठोकून पाहिला. ठोकून ठोकून बत्ता वांकला. तेव्हां केकवरच उलटा ठोकून मीं तो सरळ केला. पण केकवर मात्र कांहींच परिणाम झाला नाहीं. शेवटीं केकचा नाद सोडून मी नेहमींप्रमाणें बाजारच्या बिस्किटांवरच माझी भूक भागविली.

मराठे नांवाचा माझा एक मित्र आहे. माझ्या ऑफीसमध्यें तो कधीं कधीं येतो. तो इंजिनिअर आहे. त्याच दिवशीं तो मला भेटायला येणार होता. तो केक ऑफिसमध्यें नेऊन त्याला दाखविण्याचें मी ठरविलें. सुरुंग लावून त्यावर कांहीं परिणाम झाल्यास पाहण्याचा माझा विचार होता.

मराठे ऑफीसमध्यें आला तेव्हां तो केक टेबलावरच होता. केक उचलून तो म्हणाला, 'अरे वा! हा तुला कुठें मिळाला बुवा?'

सुनंदानें तो केला असल्याचें मी त्याला सांगितलें नाहीं. सुनंदावर माझें फार प्रेम आहे. पण कदाचित् तो केक नसून दुसरीच कांहीं वस्तु आहे असा त्याचा गैरसमज झाला असेल असें वाटून मीं त्याला विचारलें.

'तें काय आहे अशी तुझी कल्पना आहे?'

'कल्पना?' तो म्हणाला—"अरे खात्री आहे खात्री, ग्रॅनाइटच्या जातींतला फार दुर्मिळ दगड आहे हा. घेऊन जातों मी हा.'

'कशाला?' मीं विचारलें.

'एका हॉस्पिटलच्या इमारतीचा पायाभरणी समारंभ आहे. त्यासाठीं मी याचा उपयोग करीन.' तो म्हणाला.






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

तो 'दगड' घेऊन जाण्यास मीं त्याला परवानगी दिली.

घरीं आल्यानंतर सर्व प्रकार मीं सुनंदाला सांगितला. तो ऐकून ती फारच रागावली. 'कांहीं वाटत नाहीं तुम्हांला माझी अशी थट्टा करायला ?' असें कांहींतरी ती बडबडूं लागली. शेवटीं तिची समजूत काढण्यासाठीं मी म्हटलें.

'अग, तो केक आपल्या खाण्याच्या उपयोगी नाहीं पडला, तरी एका इमारतीच्या पायासाठीं त्याचा उपयोग झाला, हें काय थोडं झालं ?"

यावर ती फिसकारून म्हणाली, 'आतां चावटपणा थांबवला नाहींत तर मी रडेन हं!' शेवटीं नवें पातळ आणण्याचें कबूल केल्यावर तिचा राग शांत झाला.

(यापूर्वीं मराठेचा उल्लेख सुनंदा नेहमीं 'मराठे भाऊजी' असा करीत असे. यानंतर मात्र ती त्याचा उल्लेख नेहमीं 'तो मेला मराठे' असा करूं लागली. कां कुणास ठाऊक!)

या प्रकारच्या केकसचा नवीन उपयोग करण्याची कल्पना माझ्या डोक्यांत आली. सैन्यांतील लोकांना याचा फार उपयोग झाला असता. याचे लहान तुकडे पाण्यांत भिजवून ते खाल्ले असतां भूक सहज भागली असती. सदऱ्याच्या दोन्हीं खिशांत एक एक केक ठेवला असतां शत्रुपक्षाच्या बंदुकींतून सुटून नेमक्या छातीवर लागणाऱ्या गोळ्यांपासून सैनिकांचा बचाव झाला असता. शिवाय शत्रू समोरासमोर असतां दुसरें कोणतेंच हत्यार जवळ नसल्यास शत्रूच्या डोक्यांत फेंकून मारण्यास यांचा उपयोग झाला असता. माझे हे विचार चालू असतांच 'आतां सर्व कांहीं लक्षांत आलें' अशा अर्थाचा अभिनय करून सुनंदा म्हणाली,

'तो केक किनई जरा जास्त भाजला गेला. उद्यां मी अगदीं मऊ केक करीन हं!'

दुसऱ्या दिवशीं तिनें परत केक केला. हा तिनें 'अगदीं कमी' भाजला होता. त्यामुळें तो 'खूप मऊ' झाला आहे असें ती म्हणाली. लोण्याबरोबर खाल्यास तो चांगला लागतो अशी माहिती तिला कुठून तरी मिळाली असती. कारण एका ताटलींत एक भला मोठा लोण्याचा गोळा ठेवलेला होता.

'पण केक कुठें आहे ?' मीं विचारलें. 'आणि हें एवढं लोणी काय करायचं आहे ?'

'झाला का परत चावटपणा सुरू ?' सुनंदा म्हणाली. तें लोणी नसून केकच असल्याचें तिनें मला सांगितलें.

'विटेपेक्षां लोणी मऊ' असा विचार करून मी तो केक खाण्याचें ठरविलें. हा केकसुद्धां माझ्या मित्रला नेऊन देतों. तो कालचा दगड बसविण्यास प्लास्टर म्हणून याचा उपयोग होईल' असें मी तिला सांगितलें "आम्ही नाहीं जा." असें म्हणून ती घरांत निघून गेली.

दुसरे दिवशीं पुन्हां तिनें केला. हा फारच चमत्कारिक झाला होता. तो एखाद्या शहाळ्यासारखा होता. बाहेर टणक कवच, तर आंत मऊ मलई. तो फोडतांना खूपच त्रास झाला आंतील भाग मात्र चमच्यानें खावा लागला.

(पान ३४ वर चालू)

कलाकृतींच्या जन्मकथा :



# 'मृगजळांतील कमलिनी!'

"किती निष्पाप लावण्य!—" कबुतराच्या जोडीला हृदयाशी घेऊन बसलेल्या या मुलीबद्दल कोणीही असेच उद्गार काढील. तिच्या पाणीदार टपोऱ्या डोळ्यांत किती मोहकता भरली आहे! गुलाबाच्या उमलत्या पाकळ्यांसारखी तिची नाजुक ओष्टदलें किंचित् अलग झाली आहेत. चेहऱ्यावर मंदमधूर हास्य पसरलें आहे. केतकीसारखी नितळ अंगकांती तिच्या नाजुकपणांत भर घालीत आहे. डोक्यावरचे कुंतल स्वाभाविकपणें गालावर रुळत आहेत. मांडीवर अंड्यांची टोपली आहे आणि ही मुग्ध बालिका आपल्या नाजुक बोटानें कबुतराच्या जोडीचे पंख कुरवाळीत बसली आहे. या चित्रांत प्रमदेची मादकता नाहीं तर कुमारिकेच्या लावण्याची निरागसता आहे. हे मनोहर चित्र पाहून कुणा रसिकाचें मन प्रफुल्लित होणार नाहीं!

ग्रेडझेनें काढलेलें हे चित्र त्याच्या काळांत फारच प्रसिद्धीला आले होते. ग्रेडझेचे लहानपण हालांत गेलें होतें. वडिलांनीं त्याच्या चित्रकला शिक्षणाला विरोध केल्यामुळें घरदार सोडून हा तरुण चित्रकार परांगदा झाला. पॅरिसमध्ये येऊन चित्रकलेच्या व्यवसायाला त्यानें सुरवात केली पण त्याला कुठेही नोकरी मिळेना. अर्धपोटी राहून त्याला दिवस घालवावे लागत होते. केवळ शरिरानें तो धडधाकट होता म्हणूनच ते हालाचे दिवस तो घालवू शकला.

या काळांतच पॅरिसमधल्या एका जुन्या पुस्तक विक्रेत्याशी व त्याची ओळख झाली. त्या विक्रेत्याची मुलगी अतिशय लावण्यवती




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

होती. ग्रेडझेनें तिला विचारलें, "तुझं चित्र काढावं असं माझ्या मनांत फार आहे. तूं कधीं माझ्या घरीं येऊं शकशील कां ?"

ग्रेडझेच्या त्या निमंत्रणाला तिनें हंसतमुखानें संमती दिली. येताना तिनें आपल्या आवडत्या कबुतरांची जोडी बरोबर आणली होती. कबुतरांना कुरवाळीत ती बालिका ग्रेडझेपुढें बसली. ग्रेडझेची कला समाधी लागली. ते चित्र काढताना त्याचे मन विलक्षण रंगून गेलें. कलाकृतीच्या निर्मितीचा आनंद इतक्या प्रभावीपणें त्यानें असा कधींच अनुभवला नव्हता. कांहीं थोड्या दिवसांच्या अवधीतच 'गर्ल विथ् डोव्हज्' चित्र तयार झालें.

चित्र तयार होत असतांना न कळत एक गोष्ट घडत गेली होती. ग्रेडझेचें मन त्या तरुणीवर जडलें होतें. त्याच्या मानसमंदिरांत तिची प्रतिमा स्थिर झाली होती. तिच्या हातांतली--प्रणयाचें प्रतीक असलेली—ती खबुतरांची जोडी ग्रेडझेच्या हृदयांत फडफडूं लागली होती. तिचा सहवास त्याला हवासा वाटूं लागला होता. त्यानतर ग्रेडझे तिला वारंवार भेटूं लागला. तिची आणखी चित्रें काढण्याची मनिषा तो तिला सांगूं लागला. जें केवळ मनांत होतें तें कृतींत दिसूं लागलें आणि हळूहळूं लोकांच्या डोळ्यांवरहि येऊं लागलें.

अखेर ग्रेडझे आणि ती लावण्यवती–ॲना गॅरविएला–यांचा विवाह झाला. प्रेमसाफल्याचा केवढा तरी आनंद ग्रेडझेला झाला. लग्न झाल्यावर ॲनाची कितीतरी चित्रें त्यानें चितारलीं आणि त्या चित्रांच्या प्रदर्शनामुळेंच ग्रेडझेचें भाग्य उदयाला आलें. ग्रेडझेचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालें. त्याच्या चित्रांना खूप मागणी येऊं लागली. त्याच्याकडे कीर्ति आणि संपत्तीचे ओघ वाहूं लागले. ॲना-मुळें हें सारें घडलें याची ग्रेडझेला जाणीव होती. तिला कुठें ठेवूं आणि कुठं नाहीं असें त्याला झालें होतें.

पण या सुखाला दृष्ट लागायची होती ! ग्रेडझेनें काढलेल्या ॲनाच्या सौंदर्यशाली चित्रांमुळें ग्रेडझेच्या चित्राइतकींच ॲनाही लोकांच्या डोळ्यांत भरू लागली. या लावण्यलतिकेला बघण्याची इच्छा अनेक तरुण मनांत उत्पन्न झली. कबुतरांना हृदयाशीं घेऊन बसलेल्या त्या निष्पाप ॲनावर आतां कैक लोकांची पापदृष्टी पडूं लागली. ग्रेडझेसारख्या सरळ वृत्तीच्या कलावंताला ॲनाला संभाळणें जड जाऊं लागलें. आणि जी अमृतवेल होती ती विषवल्ली झाली. ॲनाचें चारित्र्य बिघडलें. इतर तरुणांबरोबर ती हिंडूं लागली ! मौज मारू लागली !

आपल्या प्रेयसीच्या या वर्तनानें ग्रेडझीचें मन विदीर्ण झालें. त्यानेंच तिला प्रसिद्धि मिळवून दिली होती. त्याच्याच कुंचल्याच्या करामतीनें तिच्या लावण्याला कीर्तीचें वलय लाभलें होतें. आणि आतां तीच त्याच्याशीं बेइमान झाली होती ! त्याच्याकडे ती पैशाची मागणी करी—स्वतःच्या चैनीकरतां त्याच्याकडून पैसे घ्यायला तिला शरम वाटत नव्हती. आणि तोही तिच्या मागणीला कधीं हरकत घेत नव्हता. ग्रेडझे पैसे देत होता—ॲना पैसे उडवत होती.

पण अखेरपर्यंत ॲनानें एकच गोष्ट पाळली. ती म्हणजे मॉडेल म्हणून ग्रेडझे पुढें बसायला तिनें कधींही नकार दिला नाहीं. आणि ॲनाचें चित्र रंगवायला बसला कीं ग्रेडझेही तिचें सारें कलंकित चारित्र्य विसरून जाई. पॅलेटवर रंग मिसळूं लागले कीं त्याची पुन्हा समाधी लागे. प्रथम भेटींत काढलेल्या त्या खबुतराबरोबरच्या निष्पाप बालिकेची तो आठवण करी आणि ते निष्पाप लावण्य पुन्हा आपल्या चित्रांतून दाखवण्याचा तो प्रयत्न करी. ते टपोरे भावपूर्ण डोळे तसेच निरागसपणें चित्रित होत. ते पुष्पदलासारखे ओठ तसेच अलग होत. तेच अस्फुट स्मित गालावर पसरे आणि ती प्रथमभेटीं-तली शुद्ध निरागस प्रेयसी त्याच्या चित्रांत साकार होई.

प्रत्यक्षांतल्या प्रेयसीनें जरी त्याच्याशी प्रतारणा केली होती तरी त्याच्या हृदयांतली तिची कलाप्रतिमा अभंग होती. ग्रेडझेच्या जीव-नांत तेवढाच आनंद आता शिल्लक राहिला होता !

—भय्यासाहेब ओंकार

---

(पान ३३ वरून चालू)

हे केक आतां रोज खावे लागणार या भीतीनें मी बेजार झालों. सुनंदाची मैत्रीण अजिबात जन्माला आली नसती तर बरें झालें असतें असा विचार माझ्या मनांत येऊन गेला. त्या मासिकांत तिनें वाचलें तें सुनंदेला सांगितलें यांत तिचा तरी काय दोष असें वाटून त्या मासिकाच्या संपादकांना एक खरमरीत पत्र लिहिण्याचें मीं ठरविलें. त्यापेक्षां संपादकमहाशयांना प्रत्यक्ष चहाला बोलावून त्यांच्या उपद्व्या-पाचें हें फळ त्यांना चाखण्यास द्यावें अगर जमल्यास त्यांच्या डोक्यांत घालावें असाही एक विचार मनांत येऊन गेला.

खाण्याचा सोडा कमी झाल्यामुळें केक असा झाला असावा असें स्पष्टीकरण सुनंदानें केलें. दुसरे दिवशीं भरपूर सोडा घालून तिनें केक बनवला. हा मात्र अगदीं खुसखुशीत झाला होता. तो टेबलावर ठेवतांना 'मला केक बनवितां येत नाहीं म्हणतां ना ? पहा कसा छान केक बनवलाय मीं.' असेंही ती म्हणाली.

पण केक प्रत्यक्ष खातांना निराळाच अनुभव आला. केवळ सोडा-खाराचाच तो केला आहे असें वाटत होतें. तोंडांत टाकतांच तो पटकन् विरघळून जीभ चुरचुरूं लागली त्याच दिवशीं शेतकी कॉले-जांत लेक्चरर असलेला माझा एक मित्र मला भेटण्यांस आला होता. तो केक त्यानें पाहिला आणि त्याचा वास आणि चव घेऊन 'याचा चुरा करून झाडांना घातल्यास खत म्हणून चांगला उपयोग होईल' असें तो म्हणाला.

इतकें झालें तरी सुनंदानें केक बनविणें थांबविलें नाहीं. तिनें निरनिराळे प्रकार करून पाहिले. पाणी + कोंडा, दूध + कोंडा, पाणी + दूध + कोंडा, अंडें + दूध + कोंडा, पाणी + अंडें + दूध + कोंडा. असें निरनिराळे पदार्थ तिनें वापरून पाहिले. लोण्या-पासून लोलंडापर्यंत सर्व प्रकारचे पदार्थ तयार झाले. पण केक मात्र कधीं झाला नाहीं.

हे केक रोज खाऊन मला आतां अपचनाचा विकार जडला आहे. केक कसे बनवायचे हें माझ्या बायकोला कुणी तरी शिकवेल काय ?

: अनुवाद :

—विठ्ठल रामजी भाटकर

•••






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट



## एक पानी कथा

# पोलीस प्रमुख

रात्र काळीकुट्ट होती आणि त्या घराचा रंगहि काळा होता. त्यावेळीं सारं स्तब्ध आणि शांत होतं. अशा वेळीं दोन माणसं त्या घराच्या दिशेनें दबकत येत होतीं.

पूर्ण शांतता होती तिथं. नंतर बाहेरच्या काळोखांतून थोडासा आवाज, किंचित्—

"आपण इथं बाहेर जास्त वेळ रहाणं योग्य नाहीं...ही सूटकेस नीट धर...चावी लावून दार उघडण्याचा प्रयत्न कर...आपल्याला आंत गेलंच पाहिजे..."

दहा सेकंद–वीस सेकंद–तीस सेकंद—आणि एकदाचा दरवाचा उघडला. ते दोघेजण हळूंच आंत गेले व त्यांनीं परत दरवाजा बंद केला.

थोड्या वेळानं—

"आपण घरांतून चक्कर तरऽमारूंया."

"सावकाश हेन्री."

"कोणीच उठलेलं दिसत नाहीं अद्याप—कोण आलाच पुढें तर गोळी घालूया—" आणि बॅटरीचा छोटासा कवडसा खोलीभर भिरभिरला. बॅटरी हातांत घेतलेला मनुष्य म्हणाला, "ब्लॅकी इथं तर कुणीच दिसत नाहीं. आपण भाग्यवान आहोंत. ही माणसं कुठेंतरी बाहेर गेलीं असावींत."

"तरीहि आपण पूर्ण खात्री करून घेऊं या."

आणि दोघानी मिळून सबंध घराचा तलास केला. प्रत्येक खोलीखोलीतून शोध घेतला. घरांत खरंच कुणी नव्हतं. तीं माणसं बाहेर गेलीं होतीं खास. गेले कित्येक दिवस तीं या घरांत नव्हतीं.

होय, हेन्री होगन आणि ब्लॅकी बर्न हे दोघेहि आज नशिबवान होते. पश्चिम किनाऱ्यावरील एका मोठ्या गावीं त्यानीं दरोडा घातला व दैवानं त्यांना हात दिला होता. परंतु अवघ्या एक तासापूर्वीची गोष्ट. ब्लॅकी मोटार हाकीत होता; पण त्याची गाडीं एका पोलिसाच्या अंगावर गेली. ब्लॅकीने चपळाईनें गाडी फिरविली व पळ काढला. अर्थात् त्यांचा जोरदार पाठालाग झाला. आणि मग पोलिसांची एक गोळी त्यांच्या मोटरच्या पेट्रोल टॅकमध्यें घुसली. त्यानीं लगेच गाडी सोडून सूटकेससह पळ काढला. सुदैवानें म्हणा अगर दुर्दैवाने म्हणा आतां ते या घरांत आहेत. खोलीच्या मध्यावर असलेल्या टेबला वर सूटकेस ठेवली आहे. त्यामध्यें तीन लक्ष डॉलर्सच्या नोटा आहेत.

"हें पहा" होगन म्हणाला, "आपणाला मोटार घेतली पाहिजे—शक्य तों लौकर, विकत—म्हणजे उद्यां सकाळीं आठ वाजेपर्यंत आपणांस थांबलं पाहिजे."

"तें ठीक आहे "बर्न म्हणाला" पण तोपर्यंत त्या सूटकेसचं काय करायचं ?"

"काय करायचं ?—अरे ती इथंच कुठंतरी लपव. मोटार खरेदी करीपर्यंत आपल्याबरोबर बाळगणं धोक्याचं आहे."

आणि मग त्यानी ती सूटकेस खालीं तळघरांत नेली; व कोळशाच्या पोत्यांत आंत लपवून ठेवली. व सारं ठाकठीक झाल्यावर पहांटे झुंजुमुंजू दिसतं न दिसतं तोंच ते दोघे त्या घराबाहेर पडले.

"हें पहा ब्लॅकी" रस्त्यावर येतांच होगन म्हणाला "आतां ज्यांच्या घरांत आपण प्रवेश केला त्या सद्गृहस्थांचं नांव श्री. सॅम्युअल रॉजर्स."

"तुला तें कसं कळलं ?"

"त्यांच्या पुस्तकावर वाचलं मी. कितीतरी पुस्तकं आहेत त्यांच्या लायब्ररींत."

* * *

सकाळीं आठ वाजतां त्यानीं पाहिलं तो त्या घराचं पुढचं दार सताड उघडं ! खिडक्यांहि उघड्या ! म्हणजे—? ही मंडळी परत आलेली दिसते !

आता काय करायचं ? ती सूटकेस कशी मिळवावची ?

"मि. बर्न्स आतां काय करायचं तें सारं तूं माझ्यावर सोपव. तूं गाडी चालव तोपर्यंत मी माझं डोकं चालवतों...चल एखाद्या पब्लिक टेलिफोनकडे घेऊन चल मला झटपट."

आणि थोड्याच वेळांत त्यांना सॅम्युअल रॉजर्सचा टेलिफोन नंबर मिळाला.

"येस्—मी रॉजर्स बोलतोय्."

होगननें आपला गळा साफ केला व तो म्हणाला "मि. रॉजर्स, मी पोलिस हेडक्वार्टर्समधून बोलतोय्—माझं नांव सिम्पसन. डिटेक्टिव्ह ब्रँचचे सार्जेंट सिम्पसन—"

"अच्छा पुढं बोला सिम्पसनसाहेब."

"आमच्या पोलीस खात्याच्या प्रमुखांनीं मला तुमची भेट घ्यायला सांगितलंय मी माझ्याबरोबर आणखी एक मनुष्य घेऊन येतोय्."

"ठीक आहे. मी तुमची वाट पहातों." रॉजर्स म्हणाले.

"आणि मि. रॉजर्स या सान्याविषयीं गुप्तता राखा. कुणाकडे कांहीं बोलूं नका. मी आल्यावर कां तें सांगतोच.

आणि मि. रॉजर्सच्या बंगल्याकडे जातांना मि. हॉगननें आपली कल्पना आपल्या सोबत्याला विषद करुन सांगितली.

दहा मिनिटांच्या आंतच "सार्जेंट सिम्पसन" आणि "साध्या कपड्यांतील एक पोलीस" हे रॉजर्सबरोबर बोलत होते व मि. रॉजर्स आश्चर्यचकित झाले होते.

मि. होगननी त्यांना सर्व हकीगत सांगितली. अर्थात् थोडीशी बदलून.

होगनबरोबर ते खाली तळघरांत गेले. आणि थोड्याशया परिश्रमानंतर त्यांना तिथं लपविलेली सूटकेस मिळाली. ती घेऊन ते वरती आले; व उघडली. आंत गच्च भरलेल्या नोटा होत्या. सूटकेस बंद करून होगनने ती आपल्या ताब्यांत घेतली.

"मि. रॉजर्स" ऑफिसरच्या रुबाबांत होगन म्हणाला, "आतां मला व माझ्या सहकाऱ्याला लौकर गेलं पाहिजे. वेळोवेळीं काय झालं तें मी तुम्हाला कळवीनच."

त्यानें सूटकेस उचलली व जावयास पुढें पाऊल टाकलं. मि. बर्न्स पण त्याच्या पाठोपाठ निघाला. ते तिघे दारापर्यंत गेले. मि. रॉजर्सनी दरवाजा उघडला व 'यारे आंत' असं कुणासतरी ते सौम्यपणें म्हणाले, आणि तीन मनुष्य आंत आले. तिघे आडदांड पुरुष ! त्यांनी येतांच मि. होगन व मि. बर्न्स यांच्याकडे रोखून पाहिलं.

"रॉजर्स याचा अर्थ काय" होगनने आपली कोरडी जीभ ओठावरून फिरवीत विचारलं.

"त्याचं असं आहे" मि. रॉजर्स म्हणाले "इथला पोलीस प्रमुख मी आहे." • •

अनुवाद—श्रीकृष्ण ठाकूर







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




*गेले कित्येक महिने प्रा. अनंत काणेकरांनीं वाचकांना मलाया-सिंगापूर विभागांतील रम्य प्रदेशाचें दर्शन घडविलें— त्या रसभरीत प्रवासवर्णनाचा हा अखेरचा हप्ता !*

# गॉलफेलच्या समुद्रकिनाऱ्यावर

अनंत काणेकर

**९ जून १९५५**

आज दुपारीं १२–३० वाजतां बोट सिंगापूर सोडणार. उद्यां दुपारीं पुन्हां पिनांग.

**१० जून १९५५**

दुपारीं १ ला पिनांगच्या धक्क्याला बोट लागली. आम्हीं जेवण करून बाहेर पडायला तयारच होतों. सकाळपासून पाऊस होता. पिनांगला आलों तेव्हांहि पाऊस चालूच होता पिनांगमधल्या युनायटेड कमर्शियल बँकेचे मॅनेजर आणि सोनाळकरांचे मित्र श्री. अय्यर हे आपली मोटर घेऊन बोटीवर आम्हांला भेटायला आलेच होते. त्यांनीं आम्हांला आपल्या घरीं नेलें. सौ. अय्यर इंग्रजी आणि हिंदुस्थानी चांगलें बोलत होत्या, इतकेंच नव्हे तर मला मराठीहि चांगलें समजतें, त्या म्हणाल्या ! पूर्वी त्या माटुंग्यांत कित्येक दिवस राहिलेल्या होत्या. त्यांनीं दिलेले गरम गरम 'मेद्दु वड्डाई' आणि चहा घेऊन आम्हीं फिरायला बाहेर पडलों. आधीं पिनांगमधले आमचे जुने मित्र श्री. ठाकोरलाल यांना भेटायला त्यांच्या पुलिया स्ट्रीटमधल्या घरीं गेलों. त्या दिवशीं रात्रीं बॅडमिन्टनचे सामने खेळायला पिनांगमध्यें आलेल्या आमच्या नंदू नाटेकर, डोंगरे, हेमाडी वगैरे खेळाडूंना पिनांगच्या इंडियन असोशिएशनतर्फे 'उभे जेवण' (ब्यूफे-डिनर) होतें. त्याला येण्याचें आग्रहाचें आमंत्रण ठाकोरलालांनीं असोसिएशनचे उपाध्यक्ष या नात्यानें आम्हाला दिलें. ठाकोरलालांशी गप्पागोष्टी करून पिनांगमधलें एक फार जुने बौद्ध मंदिर आणि मठ पाहायला आम्ही बाहेर पडलों.

तिबेट किंवा चीनच्या बाहेर चिनी भिक्षूंचा असा हा एकमेव मठ आहे म्हणतात. पिनांगमधल्या टेकडीवर हा मठ आहे; आणि मुंबईमधल्या बाबुलनाथाच्या मंदिराकडे जातांना ज्याप्रमाणें पुष्कळशा पायऱ्या चढून वर जावें लागतें तसेंच इथेंहि जावें लागतें. झिम् झिम् पाऊस पडत होता, आणि टेकडीच्या टोकाशीं ढग घोटाळत होते. बाबुलनाथाच्या पायऱ्या चढून जातांना दोन्ही बाजूला जसे भिकारी बसलेले दिसतात तसेच इथेंहि होते; पण हे चिनी भिकारी ओरडाआरड करून जाणाऱ्या येणाऱ्यांचा पिच्छा पुरवीत नव्हते–नुसता हात पुढें करीत होते.

पायऱ्या चढून वर जातांना दोन्ही बाजूंना छोटीं छोटीं खोपटवजा दुकानें दिसलीं. मात्र हीं दुकानें आमच्या देवळाजवळच्या अबीर-बुक्याच्या किंवा फुलांच्या दुकानांसारखीं नव्हतीं; ससे, कोंबड्या वगैरेंची होतीं !

एक खप्पड चेहेऱ्याचा गरीबसा चिनी, मी तुम्हाला सर्व मठ दाखवतों, तुम्हाला काय हवें तें मला द्या असें म्हणत आमच्या मागें मागें येत होता. त्याला आम्ही बरोबर घेतला. माणूस फार चांगला होता, आणि इंग्रजीहि बरें बोलत होता. अर्ध्या पायऱ्या-चढून गेल्यावर एका बाजूला एक लहानशी पुष्करिणी दिसली. तिच्यांत मध्यभागीं एक मोठा थोरला दगडाचा कासव होता. त्याच्या पाठीवर पाण्यांतलें जिवंत कासव चढून बसले होते, आणि कुणी हिरवीं पानें आंत टाकली तर झुंड करून तिकडे जात होते आणि तीं पानें मटकावून टाकीत होते. दुसऱ्या एका लहानशा पुष्करिणींत बरेच मासे होते. ते लोकांनी टाकलेलीं बिस्किटें खात होते ! टेकडीच्या टोकाशी उंचावर कानटोपीच्या वर उचललेल्या कानासारखीं दिसणारीं मठाचीं चिनी छपरें दिसत होती. हवा सर्द, ढगाळ, पावसाळी होती. त्यांत त्या जुनाट मठाच्या दमट, कळकट भिंती अधिकच जुनाट आणि कळकट वाटत होत्या. अशाच एका कळकट खोलींत भेंडीबाजारांतल्या कळकट चहाच्या दुकानांत असतात तशीं मळकट टेबलें आणि प्रत्येक टेबलाभोंवतीं तीनचार जुनाट बेंटवुडच्या लाकडी खुर्च्या दिसल्या. हें काय मठांतलें चहाचें दुकान आहे कीं काय, म्हणून आम्ही आमच्या चिनी वाटाड्याला विचारलें. छे, छे तो म्हणाला, अहो ही भिक्षूंची जेवणाची खोली आहे ! या खोलीवरून इथले चिनी भिक्षू कसे असतील याची कल्पना आम्ही केलीच होती. ती लवकरच खरी ठरली; पलीकडे एका खोलीच्या दाराशीं मळकट पायजमे आणि काखेंत उसवलेले गंजीफ्रॉक घातलेले चारपाच मोडकळीला आलेले म्हातारे, अर्धे म्हातारे चिनी काचेच्या पेल्यांतले कांहीं तरी हातांतल्या काड्यांनीं पटापट खात असलेले दिसले. आम्हाला वाटलें, हे कुणीतरी मठांतले नोकर असतील. भिक्षू







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

निदान भगव्या वस्त्रांत तरी असतील. हे कोण म्हणून वाटाड्याला विचारलें, तेव्हां तो म्हणाला, 'हेच या मठांतले भिक्षू ! असे तीस भिक्षू या मठांत आहेत म्हणे.

मठाच्या एका सोप्यांत एक मोठा थोरला लाकडी मासा साखळ्यांनी टांगलेला दिसला. त्याच्यावर काठ्या मारून ढोलासारखा आवाज काढतात. भिक्षूंची जेवणाची वेळ झाली कीं हा वाजवतात. एका दालनांत छोट्या छोट्या चौकोनी गाद्या इतस्ततः पडलेल्या दिसल्या. या गाद्यांवर गुढगे टेकून भिक्षू प्रार्थना करतात. एका भव्य दालनांत चकचकीत ब्रॉन्झ धातूची बुद्धाची एक प्रचंड मूर्ति होती. बाजूला चिनी बौद्धांचा स्वर्ग दाखवला होता. त्यांत झाडांच्या हिरव्या फांद्यांवर छोटे छोटे चिनी देव पाखरासारखे बसले होते. लहान लहान नऊ मूर्ति एके ठिकाणीं होत्या. या आमच्या नऊ कन्यका, आमचा चिनी वाटाड्या म्हणाला. आमच्या सप्त मातृकांची मला आठवण झाली. एकीकडे बौद्ध नरक दाखवला होता. हातांत लांबरुंद खड्ग घेतलेले यमदूतांसारखे तीन मिशाळ देव या यमपुरीचे प्रमुख होते. मध्यें चिनी बौद्धांची हंसऱ्या चेहऱ्याची लंबोदर बुद्धमूर्ति होती. तिच्या दोन्हीं बाजूंना खोटें बोलणारे, चोरी करणारे, दारू पिणारे, इत्यादि पाप्यांना धिप्पाड यमदूत शिक्षा करीत असलेली दिसत होते.

सिंगापूरचे—टायगर बामवाले धनाढ्य आह बून पार यानीं मोठी थोरली बुद्धमूर्ति असलेला पिवळ्या रंगाचा एका सातमजली पॅगोडा इथें बांधला आहे. सयामदेशानें दिलेली बुद्धाची एक सुरेख सुवर्णमूर्ति एके ठिकाणीं काचेच्या पेटींत ठेवली आहे. जपान्यानीं पिनांग घेतलें तेव्हां त्यांनीं या मठाला दिलेली शुभ्र संगमरवरी दगडाची एक 'करुणादेवी' (गॉडेस् ऑफ मर्सी) एके ठिकाणीं दिसली !

संध्याकाळीं साडेसहाला बोटीवर परत आलों. कपडे बदलून पिनांगच्या क्लब हाऊसमध्यें इंडिया असोसिएशनच्या जेवणाला साडेसातला जायचें होतें. अय्यरांनीं दिलेल्या मोटारींतूनच पिनांगमध्यें फिरत होतों. कपडे बदलून सात वाजतां त्यांच्या घरीं गेलों. त्यांच्याकडे कुआलालंपूरच्या रबर प्रयोगशाळेंतले एक शास्त्रज्ञ श्री. चंद्रशेखर हे मद्रासी गृहस्थ आले होते. त्यांच्या भावाचा जांवई डॉ. कृष्णन् पिनांगमधल्या जनरल हॉस्पिटलांत डॉक्टर आहे. डॉ. कृष्णन् आणि त्यांची पत्नीहि अय्यरांकडे असोसिएशनमध्यें जायला आलेलीं होतीं. सौ. कृष्णन् या पिनांगमधल्या इंडियन असोसिएशनच्या महिला शाखेच्या अध्यक्ष आहेत. ही दोघेंहि पतिपत्नी मद्राशी असूनंहि चांगलीच गौरवर्ण आणि देखणीं आहेत. सर्व मिळून साडेसातला क्लबहाऊसमध्यें गेलो. क्लबच्या दाराशींच असोसिएशनचे शीख अध्यक्ष श्री. बलवंतसिंग यांनीं आमचे स्वागत केलें. अद्यावत् इंग्रजी कपड्यांतले बरेचसे शीख इथें आम्हांला भेटले. मथुरेकडल्या भय्यानें केलेलें मूगडाळ, भात, पुरी, शिरा, समोसे, मटर बटाट्याची



भाजी वगैरे उत्कृष्ट पदार्थांचें शाकाहारी जेवण होतें. कोंबडी वगैरेचें मांसाहारी जेवणहि थाटाचें होतें. ज्याला हवें तें त्यानें घ्यावें. संत्र्यांचा रस किंवा व्हिस्की यांचीं ग्लासेंहि रिकामी राहूं देण्यांत येत नव्हतीं.

पिनांग हॉस्पिटलमध्यें काम करणारे, छोटेसे दिसणारे डॉ. राव मला इथें भेटले. मोठे बोलके आणि सुस्वभावी. ते इंग्रजींत म्हणाले, 'अहो, मी महाराष्ट्रीयच आहे. पण मराठी मात्र येत नाहीं ! माझे वडील प्रो. संजीवराव मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत इंग्लिशचे प्रोफेसर होते. ते मूळचे पुण्यांतले. माझी आई तंजावरकडली. मला वाटतं, आमचं मूळ नांव पुणतांबेकर. मद्रासहून वडील ओरिसांत पुरीला गेले. मला इकडे चांगले चौदाशें मलायी डॉलर्स म्हणजे जवळ जवळ दोन हजार रुपये पगार मिळतो. पण माझ्या मनांतून पुण्याला घर बांधून तिथं राहायचंय ! पुण्याची हवा छान आहे कीं नाहीं ?'

मला हळूंच कोपरानें खुणवून पुण्याच्या हवेची स्तुति करायला त्यांनीं कानांत सांगितलें. सुंदर रेशमी साडी नेसलेली त्यांची चिनी बायको त्यांच्याबरोबर होती. तिचें नांव त्यांनी मालती ठेवलें आहे. हिंदुस्थानांत जाऊन स्थाईक व्हायचं तर बंगलोरला घर बांधून रहावें, असा तिचा आग्रह होता. बंगलोर फार चांगलें शहर आहे असें कुणी तरी तिच्या डोक्यांत भरवून दिलेलें होतें. डॉक्टरांच्या मनांतून पुण्याला घर बांधायचें होतें. म्हणून ते मालतीजवळ पुण्याची जोरानें शिफारस करायला मला खुणावीत होते !

बॅडमिन्टनचें जागतिक अजिंक्यपद मिळवणाऱ्या देशाला 'टॉमस् कप्' देण्यांत येतो. तो ज्यांच्या नांवाचा आहे ते सत्तरीच्या जवळ आलेले जॉर्ज टॉमस आजच्या जेवणाला हजर होते. मलायाच्या बॅडमिन्टन असोसिएशनचें अध्यक्ष हिया लूक सियांग यांचें जेवणानंतर भाषण झालें. आमच्या बॅडमिन्टन संघाचे मॅनेजर श्री. आगाशकर यांनींहि उत्तराचें भाषण चांगलें केलें. पिनांगचें प्रतीक कोरलेले चांदीचे चमचे आमच्या नन्दू नाटेकर, डोंगरे वगैरे भारतीय खेळाडूंना स्मृतिचिन्हें म्हणून देण्यांत आलें.

पिनांगमधले आमचे मित्र श्री. टाकोरलाल, श्री. अय्यर, डॉ. कृष्णन्, सौ. कृष्णन् वगैरेंचा निरोप घेऊन बोटीवर रात्रीं १० वाजतां परत आलों. याच बोटीनें आमचे बॅडमिन्टन खेळाडू घरीं परत येत आहेत. ते साडेदहा वाजतां बोटीवर आले. रात्रीं दोन वाजतां बोटीनें पिनांग सोडलें.

**११–१२ जून १९५५.**

आकाश स्वच्छ निळें आहे, आणि स्वच्छ सूर्यप्रकाश पडला आहे. पण बोट मात्र फार हलते आहे. आडवी डुलत नाहीं, तर उभी वर खालीं होते आहे.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

**नवलकथेहूनही विलक्षण!**



# काळ आला होता....पण

सहल म्हटली कीं आमच्या उत्साहाला उधाण यायचं अगदी! पण तोच शब्द आतां उच्चारतांच मात्र अंगावर अक्षरशः कांटा उभा रहातोय. सहलींत घडलेला तो प्रसंग...

आधुनिक तीर्थक्षेत्र—कोयना येथें आमची सहल गेली होती. तेथील धरणाचं ते प्रचंड बांधकाम, अजस्त्र यंत्रें आणि त्याबरोबरच तेथील हिरवीगार झाडी, खोल खोल दऱ्या, वळणें घेत गेलेले मोटार रस्ते हे सर्व पाहून आम्ही त्या रात्रीं पोफळीला प्रयाण केलें.

पोफळीला खूप पहायचं असल्यामुळं दुसऱ्या दिवशीं अगदीं सकाळींच आम्हीं बाहेर पडलो. वरती बोगद्यापर्यंत जायला दोन रस्ते आहेत—एक जीप-मोटारचा वळणें घेत जाणारा लांबचा रस्ता आणि दुसरा अगदी जवळचा ट्राली–रस्ता. सकाळची वेळ असल्यामुळें अंगात थोडे उत्साहाचे वारे होतेच त्यांत गुरूजींच्या परवानगीची भर पडताच आम्हीं रुळामधून ट्राली–रस्ता चढायला सुरवात केली. रस्ता अत्यंत चढणीचा असल्यामुळें माकडासारखे वाकत वाकत चढत जावे लागतें. वर येईपर्यंत अगदीं पाय दुखावयास लागले होते.. तरीपण इतरापेक्षां निराळ्या मार्गानें लवकर ध्यायच्या आनंदांत ते कष्ट, श्रम आम्हीं लगेच विसरून गेलो. तेथील बोगदे, टनेल, वगैरे पाहून आम्ही परत वळलो.

त्याच ट्राली-रस्त्यावरून आम्ही हळूहळू उतरूं लागलों. आमच्यापुढें बऱ्याच अंतरावर रूळावरून ट्राली खाली उतरत होती. चढण्यापेक्षां उतरणं अधिक अवघड. थोडेंच अंतर उतरतोय न उतरतोय तोच "धरा, धरा, धरा" असा आमच्या पाठीमागून गलका आम्हाला ऐकूं आला. माटीमागे वळून पहातोय तो काय... माझा मित्र: जगन्नाथ उतरणीवरून जोरानें गडगडत खाली येत होता. त्याला थांबवण्यासाठीं मी त्याजवर झेप घेतली, पण तो वेगांत असल्यानें मला आवरता आले नाहीं आणि दोघेहि गडगडत जावूं लागलो. सुदैवानें मला ट्रालीचा रूळ हातीं लागला. तो घट्ट पकडला. आणि स्थिर होऊन उठून बसलो. खाली पहातोय तो जगन्नाथ, उतरणीवर बांधकामासाठीं ठेवलेल्या दगड धोंड्यातून ठेचाळत, आपटत, गडगडत जात होता. तेथें काम करणाऱ्या मजुरांचें लक्ष जाताच ५–६ जणांनीं त्याला कसेतरी धरले. अगदीं देवासारखे ते वेळेवर धांवून आले.

जगूला डोकें, छाती, हातपाय सर्वांगाला वेदम मुका मार बसला होता. तात्वडतोब त्याला ट्रॉलींतून खालीं नेवून हॉस्पीटलांत पोहचवलें.

बऱ्याच वेळानंतर—साधारण दीड तासानें जगन्नाथ शुद्धीवर आला. डोळे किलकिले करून सभोंवार पाहिले अन् अगदीं थोडासाच हंसला. तेव्हां कुठं आम्हाला थोडसं हायसं वाटलं.

सहलीच्या आनंदाचा अगदीं विचका झाला होता हे खरे, पण आम्ही मृत्यूच्या अगदीं परिसीमेवरून परत आलो होतो हा कांहीं थोडायोडका आनंद नव्हता.

काळ आला होता पण...पण वेळ आली नव्हती.

—प्रताप अण्णासाहेब चव्हाण

•••

---

आमचे सर्व खेळाडू आणि बरेचसे उतारू बोट लागून बेजार झाले आहेत. खोल्या सोडून डेकवर कुणी येत नाहीं.

**१३ जून १९५५**

स्वच्छ ऊन पडलें आहे पण समुद्र अजूनहि खवळलेलाच आहे. पो ही नांवाचा एक वयस्क चिनी गृहस्थ आणि त्याची बायको माझ्या शेजारींचे डेकवरल्या आराम खुर्च्यावर बसलीं आहेत. अव्यावत् इंग्रजी पोशाखांतल्या या चिनी जोडप्याला बोलायला खूप पाहिजे. इंग्लंडमध्यें त्यांची तीन मुलें शिकताहेत त्यांना भेटायला तीं सिंगापूराहून इंग्लंडला जात आहेत. मुलगी एफ. आर. सी. एस. चा अभ्यास करीत आहे. एक मुलगा सिव्हिल इंजिनियर होतो आहे. दुसरा नुकताच दाखल झाला आहे. अर्धवट गंभीर अर्धवट हंसरा चेहेरा करून खोंचदार बोलण्यांत पो ही तरबेज आहेत. 'आमच्या जोहोरच्या सुलतानांची एक बहिण नुक्तीच वारली' ते म्हणाले, 'तिनं दहा हजार मलायी डॉलर आपला आत्मा मक्केला नेण्याकरतां जोहोरच्या मुफ्तीच्या नांवानं ठेवलेत!'

'म्हणजे!', मी उद्गारलों. 'म्हणजे काय,' पोही सांगूं लागले, 'मुफ्ती निर्धालाय अतां तिचा आत्मा घेऊन मक्केला जायला. तुम्ही हिंदू लोक मृतांना जाळतां तेव्हां तुम्ही मृताची राख काशीला घेऊन जाता. तें ठीक आहे, हो; पण आत्मा मक्केला नेण्याचं हें प्रकरण काय असेल बरं!—दहा हजार डॉलर घेऊन मजा करतोय लेकाचा तो मुफ्ती!'

**१४ जून १९५५**

सकाळीं ११ च्या सुमारास कोलंबो बंदर दिसूं लागलें. लाटांचा मारा थोपवून बंदरांतलें पाणी संथ ठेवण्याकरतां कोलंबो बंदराच्या बाहेर एक भलीभक्कम तटबंद भिंत बांधली आहे. खवळलेल्या समुद्राच्या अजस्त्र लाटा तिच्यावर ताडातावानें तुटून पडत होत्या, आणि फेंसाळत मागें परतत होत्या. लाट फुटली कीं मध्येंच तटबंदीचे काळेभुरके दगड दिसत, आणि पुन्हां पाण्यांत लपत. डेकवर माझ्या शेजारी दोन युरोपियन मुलें उभीं होतीं. 'पहा, पहा, हत्ती आंघोळ करताहेत!,' तीं उद्गारलीं.

दुपारचें जेवण बोटीवर करून दोनच्या सुमारास लॉंचमधून कोलंबोंत गेलों. एक मोटर ठरवून संध्याकाळपर्यंत कोलंबोंत भट-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कायचें ठरवलें. पांढऱ्या कोटपॅन्टमधला, आमचा काळाकुळीत सिंहली टॅक्सीवाला एक वल्ली निघाली. उत्तम इंग्रजी तो बोलत होता. इतिहास, भूगोल, चालू राजकीय परिस्थिति,—कोणत्याहि विषयावर अस्खलितपणें चर्चा करायची त्याची तयारी होती. मी मुळचा उत्तर हिंदुस्थानांतला, तो म्हणाला, आमचे पूर्वज दोन हजार चारशें नव्याणव वर्षांपूर्वी तिथून सिलोनमध्यें आले !

कोलंबोंत फिरतांना दक्षिण भारतांतल्या एखाद्या शहरांत आपण फिरतों आहोंत असा भास होतो. तसेच काळेकुळीत स्त्रीपुरुष. सुशिक्षित, वरच्या वर्गांतल्या स्त्रिया साड्या वापरतात; पण सामान्य स्त्रिया कंमरेला लुंगीसारखें पांढरें फडकें गुंडाळलेलें आणि वर पांढरेंच पोलकें अशा कपड्यांत मलबारी किंवा मल्याळी बायकांसारख्या त्या वाटतात. विशेषतः पेट्टाभागांत फिरतांना तर आपण भारतांतच फिरतों आहोंत असें वाटतें. जुनाट खटारे झालेल्या हिरव्या रंगाच्या ट्रामगाड्या इकडून तिकडे जात असलेल्या. दिसतात. मुंबईतल्या नळबाजारासारखाच जुनाट पत्र्यांचा भाजी आणि मासे बाजार. तशींच दुकानें. दुकानांत केळ्यांचे लोंगर, विनसोललेले नारळ. फार काय श्री महालक्ष्मी स्टोअर्स अशा नांवाची एखादी पाटी. मधून मधून लालवानी मोहनदास इत्यादि सिंधी नांवाची दुकानें. रस्त्यांत एखादा भगव्या वस्त्रांतला, मुंडन केलेल्या डोक्याचा भिक्षु दिसतो, आणि आपण सिलोनमध्यें आहोंत याची आठवण होते. एका रस्त्याला नांव तर भारतीय ॲव्हीन्यू असें दिसलें !—एके ठिकाणीं दहीवल पोलीस स्टेशन दिसलें. दहीवल, कोतलवल अशीं शहराच्या विभागाचीं नांवें आहेत. आमच्या टॅक्सीवाला म्हणाला, दहीवल म्हणजे लिंबाची वाडी. रस्त्याचीं नांवें कोल्लूपिटिया, बंबलापिटिया ! आनंद, मीनाक्षी अशीं माणसांचीं नांवें कांहीं ठिकाणीं आढळलीं. एका घरावर रणबाहू या नांवाची पाटी वाचली. बंदरांतल्या एका लॉंचचें नांव होतें. सिंहबाहू !

कोलंबोंतलें व्हिक्टोरिया म्यूझियम हें वस्तुसंग्रहालय पहाण्यासारखें आहे. संग्रहालयाच्या भव्य पांढऱ्या इमारतीभोंवतीं प्रशस्त बागबगीचा आहे. सिंहलद्वीपांतल्या रत्नपुर भागांत अडीच लक्ष वर्षांपूर्वीचे इतिहासपूर्व काळांतले कांहीं अवशेष सिलोनच्या पुराण वस्तुसंशोधन खात्याला उत्खनन करतांना सांपडले. ते एका दालनांत मांडून ठेवले आहेत. त्या काळांतले हत्ती, गेंडे वगैरे प्राणी आजच्या त्या जातीच्या प्राण्यांहूनहि प्रचंड आकाराचे होते. त्यांचे शिलाभूत अवशेष इथें आहेत. सांबरासारख्या, पण खूपच मोठ्या 'जायंट् एल्क' नांवाच्या प्राण्याची कवटी शिंगासह इथें आहे. त्या शिंगांनी दालनाची एक सबंध बाजू अडवली गेली आहे. हा अवशेष दहा हजार वर्षांपूर्वीचा आहे म्हणे. आपल्याइथल्या अजंठाच्या रंगीत चित्रांसारखींच सिलोनमधलीं सिगिरिया येथील भितिचित्रें प्रसिद्ध आहेत. तिथले कांहीं नमुने इथें दिसले. कँडीच्या राज-


**मरमेड पेन्टम् लि.** चे सर्व प्रकारचे रंग

**धी वॉटरप्रुफ पेपर मॅन्यु. कं. प्रा. लि.** चे

वॉटरप्रुफ पॅकिंग व रॅपिंग पेपर,

**हार्ड कॅसल वॉड मॅन्यु. कं. प्रा. लि.** चीं

औद्योगिक रसायनें व तत्सम इतर माल पुरवून

गेलीं ३७ वर्षें भारतीय औद्योगिक क्षेत्रांत आम्हीं जनतेची सेवा सतत करीत आहों.

औद्योगिक क्षेत्रांत लागणारा सर्व प्रकारचा माल आमचेकडे नेहमीं मिळतो.

चौकशीकरितां लिहाः—

**हार्डकॅसल वॉड आणि कंपनी प्रायव्हेट लि.,**

ॲलिस बिल्डिंग, डॉ. दादाभाई नौरोजी रोड, फोर्ट मुंबई—१.

टेलिग्राम : वॉडको. टेलिफोन नं. २५८८७१.

शाखा कलकत्ता, मद्रास, अहमदाबाद.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट



# ढंग

काय केलंयास ढंग !
मिशा काढल्यास; वा ऽ मेला व्हय कधी ?
नाच्या होऊन आतां
नाच जा तमाशामदी
नायकीणीगत भांग पाडलाईस
तेलाच्या वतून कुप्प्या
बकऱ्यागत कातरलीस डुई
हो जा आतां फणी-इब्या
आणि पोरींचं घालावत झगं
कशाला हे चिटाचं अंगराख नि इजार ?
अशानं का हुणार हाय
तुला बघून मी बेज़ार ?
आरं, चिरमुऱ्यागत काया तुझी
उडून चाललीया वाऱ्यावर !
माकडागत वाळलाईस !
ये जरासा थाऱ्यावर !
करावी तालीम-कुस्ती
मुरगळून साताऽठ भाकरी !
इसा-तिसानं लागतील मग;
तुझ्या पाठीमागं पोरी

— आनंद यादव

---

घराण्यांतला शेवटचा राजा विक्रमराजसिंघ आणि त्याची सुंदर राणी यांची चित्रें एके ठिकाणीं आहेत. राणी फार सुंदर वाटली, पण राजाचा च्येहेरामोहरा आणि टोपी, पोशाख नादिरशहाच्यासारखा पाहून कसें-सेंच वाटलें ! राजेपक्ष मुदलिवार नांवाच्या कुणा ऐतिहासिक पुरुषाच्या रत्नजडित मुटीच्या तलवारी एके ठिकाणीं मांडून ठेवल्या होत्या.

संग्रहालयांतून आम्ही अशोकारामय हें कोलंबोंतलें प्रसिद्ध बुद्धमंदिर पाहायला गेलों. बुद्धगयेचीं, सारनाथचीं प्राचीन बुद्धमंदिरें मी पाहिलीं आहेत. कोलंबोंतलें हें अलिकडचें बुद्धाचें मंदिर पाहून मला धक्काच बसला. बाहेरून तें गचाळ आवारांत उभे असलेल्य उपनगरांतल्या एखाद्या मळकट पांढऱ्या घरा-सारखे वाटतें. त्यांत 'मंदिरपण' कुठेंच दिसत नाहीं. आंत शिरल्यावर आजूबाजूच्या भिंतींवर रंगवलेल्या जातककथांचे भडक हिरवे, पिवळे, लाल, जांभळे रंग आणि त्यांतले स्त्रीपुरुष किंवा पशुपक्षी पाहून आपल्याकडे मारवाड्यांच्या घरांच्या भिंती चितारणाऱ्यांना फारच श्रेष्ठ कलावंत म्हणा-वेंसें वाटलें. आंतल्या गाभाऱ्यांतल्या बुद्धाची मूर्ति व इतर मूर्ति इमारतीच्या मानानें खूपच मोठ्या आहेत, पण त्यांच्यांतहि शिल्पकलेचा कुठें मागमूसहि नाहीं. बुद्धमूर्तींसमोर 'फ्रूट्' किंवा 'पॉयशा'च्या नळकांड्यासारख्या दिसणाऱ्या 'व्हिम्' पावडरच्या तसें लेबल असलेल्या पिवळ्या डबड्यांत मळकट कागदी फुलें ठेवलेलीं पाहून मला मळमळून आलें. तिथें उभ्या असलेल्या एका काषायवस्त्रधारी भिक्कूला, ही इथें कुणी ठेवली म्हणून मी विचारलें. कुणींतरी मुलीनें आणून ठेवलींत, तो भिक्कू शांतपणें उत्तरला !

कोलंबोंतल्या प्राणीसंग्रहालयाच्या बागेंत दररोज संध्याकाळीं सव्वापांच वाजतां 'हत्तींची चहापार्टी' नांवाचा एक कार्यक्रम असतो. गांवातल्या मुलांची आणि परदेशी पाहुण्यांची यावेळीं 'झू'मध्यें नेहेमी गर्दी असते. हत्तीना बाहेर काढतात आणि त्यांचा राखणदार सर्कशीतल्यासारखे अनेक प्रयोग त्यांना लोकांसमोर करायला लावतो. हत्ती त्या माणसाला सोंडेनें उचलून पाठीवर ठेवतो, त्याला स्वतःच्या जबड्यांत धरून ठेवतो, शेवटीं चहासारखें कांहींतरी पेय पिऊनहि दाखवतो ! आम्ही पांच वाजतां 'झू'च्या बागेंत गेलों तेव्हां बरोबर पांचाच्या ठोक्याला एक घंटा वाजत होती. कुणीतरी म्हणालें, वाघसिंहाची जेवायची वेळ झाली. खरोखरच त्या वेळेला मोठमोठे बकऱ्याच्या मांसाचे तुकडे नोकरलोक वाघ-सिंहासमोर नेऊन टाकीत होते. या झूमध्यें लावलेल्या पाट्या मजेदार आहेत. एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'इथें जंगलांतल्या जनावरांना बंदुकीच्या गोळ्यांची भीती काडीमात्र मनांत न आणतां मनुष्यप्राण्यांचा चांगलाच अभ्यास करतां येतो !' दुसरीकडे सुसरीच्या हाडांचा सांपळा ठेवला आहे. 'तुम्ही दगड मारून हिला ठार केली !' अशी पाटी तिथें आहे. मुलें प्राण्यांना दगड मार-तात; त्यांना दिलेली ही सूचना आहे.

गॉल फेसच्या समुद्रकिनाऱ्यावरून भटकत आम्ही बोटीकडे परत येत होतों. थोड्याच वेळापूर्वी अस्ताला जाणाऱ्या सूर्याच्या सोनेरी उन्हांनी न्हाऊन निघालेल्या, किनाऱ्या-जवळच्या माडांच्या गर्द हिरव्या राया आतां झपाट्यानें संध्याछायांत गुरफटून काळवंडून जात होत्या. त्या छायांतून दूर कुठें कुठें दिवे, लुकलुकूं लागले. एका माडाच्या झावळ्यांतून 'कुहू कुहू' असा कोकिळेचा स्वर कानावर आला, आणि आपण भारतांतच आहों असें वाटलें. आज रात्रीं बोट कोलंबो सोडणार, आणि मग दोन दिवसांनीं खरोखरच घरीं— भारतांत.

• • •

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

( पान ३१ वरून चालू )

दोरायस्वामी अय्यरची १५ दिवसांच्या रिमांडनंतर सुटका करण्यांत आली. कोइमतूर पोलिसांपाशीं चार्जशीट भरायला भरभक्कम पुरावा नव्हता आणि सी. आय. डी. ना या प्रकरणांत उगाच घाई करायची इच्छा नव्हती. त्यामुळें आरोपीनें स्वतःचें पूर्ववृत्त शिक्षण आणि व्यवसाय याबद्दल जी माहिती पुरविली तिचा खरेखोटेपणा पडताळून पाहाण्यांत आला. आणि तपासाअंतीं असें आढळून आलें कीं त्यानें दिलेली माहिती पूर्ण खोटी आहे. दोरायराजननें एका सिनेदिग्दर्शकाला पाठविलेल्या तारेवरून असें सिद्ध होत होतें कीं तो कांहीं दिवस पांडेचरीला राहिला होता. पांडेचरीला चौकशी करतां असा पत्ता लागला कीं तेथें सी. के. दोरायराजन् नांवाच्या एका इसमानें गेबल थिएटरमध्यें नाचगाण्याचे कांहीं खेळ केले आणि या कार्यक्रमांत त्याला बराच फटका बसला. पोलिसांना या खेळाची हँडबिलंहि मिळाली आणि तेथील लोकांनीं वर्णन केलेल्या दोरायराजन् वर्णनाशीं मद्रास रेल्वेस्टेशनवर अटक केलेल्या आणि स्वतःला दोरायस्वामी म्हणणाऱ्या इसमाचें वर्णन जुळतें होतें.

पण ही सगळी माहिती मिळेपर्यंत दोरायराजन् बेपत्ता झाला होता आणि आतां त्याला शोधून काढणं महाकर्म कठीण होतं.

शेवटीं महत्प्रयासानें दोरायराजनच्या चिदम्बरम् येथील घराचा पत्ता लागला. त्याचा बाप जातीनें सोनार, ऑनररी मॅजिस्ट्रेट होता. दोरायराजनच्या आठवणी सांगणारे त्याचे जुने मित्र भेटले. शाळेंत असतांना दोरायस्वामी शाळेंतल्या एकूण एक मास्तरांच्या सहीची नक्कल सफाईदारपणें करीत असे, असें अनेकांनीं सांगितलें. पोलिसांनीं त्याच्या घराची झडती घेतली. त्यांत छपाईची शाई, बराचसा टाईप, कांहीं अर्धवट छापलेल्या पत्रिका, रेल्वे गाईड, मद्रास वॉर रिव्ह्यूचे कांहीं अंक एवढें सामान मिळालें.

दोरायराजनला पकडणं पोलिसांना फारसं कठिण गेलं नाहीं. आपली मावशी अत्यंत आजारी आहे अशी बातमी त्याच्या कानीं जातांच तो मावशीला भेटायला घरीं आला आणि पोलिसांच्या तावडींत सांपडला. पोलिसांनीं त्याला छेडल्यावर त्यानें आपल्या गुन्ह्यांत वापरलेलीं सीलें, टाईप इत्यादि वस्तु हजर केल्या. मॅट्रिक झाल्यावर आपण नोकरी मिळविण्याचा खूप प्रयत्न केला पण जमलं नाहीं. प्रवास करीत असतां युद्धकाळांत लोकांमध्यें निर्माण झालेली लांचलुचपत, पैसे भल्याबुऱ्या मार्गानें मिळविण्याचा अनिवार मोह त्यानें पाहिला आणि त्याचा फायदा घेण्याची कल्पना त्याच्या डोक्यांत आली. याकरितां आपलें सर्व कौशल्य पणाला लावण्याचा त्यानें निश्चय केला. वॉर रिव्ह्यूमध्यें गव्हर्नरची सही होतीच, ती त्यानें व्यवस्थित गिरवून आत्मसात केली. आपण नेल्सन सिनेमाचीं पत्रकें छापलीं हेंहि त्यानें मॅजिस्ट्रेटसमोर कबूल केलें. मदुराईच्या तंबाखूच्या व्यापाऱ्याकडून पैसे उकळल्याच्या आरोपावर त्याच्यावर खटला भरण्यांत आला आणि त्याला दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली.

दोरायराजनची कथा इथंच संपायची. त्याचं वागणं, शिक्षण लक्षांत घेतां त्याच्यावरील इतर आरोप मागें घेऊन त्याला सुधारण्याची संधि देण्याचें ठरलेंहि होतें. पण त्याच्यांतील गुन्हेगार वृत्ति नष्ट झाली नव्हती. तिरुचिरापल्ली येथील सेंट्रल जेलमध्यें असतां दोरायराजननें आणखी एक भानगड केली. त्यानें हायकोर्टाचा सहीशिक्का मिळवून स्वतःच्या सुटकेचें एक पत्र तयार केलें आणि तें पोस्टानें जेलरच्या हातीं पडेल अशी व्यवस्था केली. या पत्रावरून त्याची मुक्तता करण्याची तयारीहि करण्यांत आली होती, पण जेलमधील एका कारकूनाला संशय आला. त्यानें हायकोर्टाला विचारून खात्री करून घ्या अशी सुपरिंटेंडला विनंति केली. हायकोर्टानें अर्थात् असा कांहीं प्रकार नसल्याचें कळविलें. त्यानंतर कोइमतूर प्रकरणीं त्याच्यावर परत खटला भरण्यांत आला. आणि दोन वर्षांची सजा देण्यांत आली.

पण १९४७ चा स्वातंत्र्यदिन दोरायराजनच्या कामीं आला. त्या दिवशीं अनेक कैद्यांना बंधमुक्त करण्यांत आलें त्यांत दोरायराजनची स्वारीहि होती.

त्यानंतर रेल्वेचीं तिकीटें तयार करण्याच्या आरोपावरून त्याला परत पकडण्यांत आलें. पण एका दयाळू मॅजिस्ट्रेटनें त्याला जामीनावर सोडलें. आज आठ वर्षें दोरायराजनचा कुठें पत्ता नाहीं.

पण कुठल्या तरी भानगडींत तो परत सांपडेल अशी खात्री आहे.

• • •


**"दीपावली"**
**वर्गणीदारांस सूचना :—**

या अंकापासून ज्यांची वार्षिक वर्गणी संपते त्यांनी पुढील वर्षाची वर्गणी (रु. १२–५० न. पैसे) १५ तारखेपर्यंत आम्हांस मिळेल अशी पाठविण्याची कृपया व्यवस्था करावी. व्ही. पी. पद्धत नसल्यामुळें ज्यांची वर्गणी जमा झाली नसेल त्यांना पुढील अंक पाठवितां येणार नाहीं.

व्यवस्थापक, **दीपावली**



**पोत**

—प्रत्येक आविष्काराला अंगभूत असें पोत असतें आणि हें पोत त्या आविष्काराला एक अविभाज्य घटक असतें...

चोखंदळ निरीक्षकांस कलात्मक अथवा अकलात्मक आविष्कारांचें पोत—सूक्ष्म दृष्टीनें न्याहाळल्यास उघड प्रतीत होतें—

चित्रकार : **द. ग. गोडसे** यांचा हा व्यासंगपूर्ण लेख, मराठी साहित्यशास्त्र्यांपुढें टाकलेला हा एक नवा पेंच—

**दिपावली वार्षिक १९६० मध्यें वाचा.**






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




# उद्धार

नकी परत येण्याचें वचन ब्रह्मराक्षसाला देऊन आपला घोडा मदनरेखेनें त्या मिट्ट काळोखांत भाल्यासारखा फेंकला, आणि क्षणार्धांत ती दिसेनासी झाली. तिचा तो विलक्षण वेग पाहून राक्षस देखील स्तिमित झाला. ती गेल्या दिशेकडे तो एकटक पाहात राहिला. कांहीं वेळानें एक छोटेसें तेजोवलय चक्राकार फिरत आपल्याकडे येतआहे असा त्याला भास झाला. तें तेजोवलय अधिकाधिक त्याच्या जवळ येत होतें. अखेर तें त्याच्या शरीरांत शिरल्यासारखें त्याला वाटलें. कदाचित् तें पुढेंहि निघून गेलें असावें म्हणून त्यानें मागें वळून पाहिलें; पण तें त्याला दिसलें नाहीं. आपल्या शापमुक्तीची वेळ जवळ आली असावी, असाहि विचार त्याला स्पर्शून गेला; पण त्याला विश्वास वाटेना. 'आपली शापमुक्ति ! आणि ती असल्या या अभिसारिकेकडून ! जारिणीकडून ! शक्य नाहीं ! तसाच पुण्यात्मा आल्याखेरीज ही गोष्ट होणें नाहीं.' अशी मनाशीं समजूत घालून तो ब्रह्मराक्षस मदनरेखा गेल्या दिशेकडे डोळे लावून वाट पाहात बसला.

"चंडी, चंडी, ओ चंडी," तिनें पांच सहा हांका मारल्या, पण आंतून ओ येईना. भ्रमिष्ठपणामुळें आपण आश्रम तर चुकलों नाहीं ना ? असें तिला वाटले; पण कसें शक्य आहे ? जिथें संबंध बालपण गेलें ती जागा विसरणें कसें शक्य आहे ? फिरून एकदां तिनें पांच सहा हाका मारल्या, आणि ती वाट पाहूं लागली. दरवाज्याच्या फटींतून तिला एक प्रकाशशलाका दिसूं लागली. तिला हायसें वाटलें. थोड्या वेळानें आश्रमाच्या दरवाजा उघडला गेला.

"कोण आहे ?" हातांतल्या मशालीचा उजेड तिच्या चेहऱ्यावर टाकीत तिला ओळखायचा प्रयत्न करीत चंडी दरवाजांत उभा होता. त्यानें मुंडन केलें होतें. मघाशीं भेटलेल्या ब्रह्मराक्षसाहून तो अधिक भयाण दिसत होता; पण त्याच्या या परिस्थितिसंबंधींच्या विचारांत वेळ घालवण्याइतकी आतां तिची मनःस्थिति नव्हती.

"मीं मदनरेखा ओळखलं नाहींस मला !"

"मदनरेखा ? यावेळीं तूं इथं ? एवढ्या अपरात्रीं इथें येण्याचं कारण काय ? तूं कसल्या संकटांत आहेस काय ?"

"असं काय करतोस चंडी ? तुला मीं वचन दिलं नव्हतं का ? माझ्या लग्नानंतरची पहिली रात्र मीं तुला देईन, असं मीं त्या दिवशीं बोललें नव्हतें का ? मीं आलें आहे, चंडी मीं आलें आहें ! माझा शब्द मीं पुरा केला आहे."




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

## पूर्व सूत्र

मगधदेशाचा राजा कनकेश्वर याला यज्ञदेवतेनें दिलेली कन्या 'मदनरेखा' हिची ही कथा. पौगंडावस्थेंत गुरुगृहीं विद्याभ्यास करीत असतां 'चंडी' नांवाच्या गुरुपुत्राचें हिच्यावर प्रेम बसलें. राजकन्येला त्याची जाणीवहि नव्हती. पुढें एकदां एका एकांत स्थळीं राजकन्येची व गुरुपुत्र चंडीची गांठ पडली असतां संधी साधून चंडीनें तिच्याशीं अतिप्रसंग केला; पण—लग्नानंतरच्या पहिल्या रात्रीं स्वतःला पतीचा स्पर्श व्हायच्या आधीं चंडीकडे यायचें विचित्र वचन देऊन, राजकन्येनें अत्रनिशी आपली सुटका करून घेतली. पुढें तिनें अवंतीच्या राजकुमाराशीं लग्न केलें व त्या थोर हृदयाच्या महात्यानें स्वतःच्या पत्नीला वचनपूर्तिसाठीं लग्नाच्या पहिल्याच रात्रीं जायला परवानगी दिली; परंतु वाटेंत राजकन्येला एका ब्रह्मराक्षसानें अडविली. मोठ्या मिनतवारीनें मदनरेखेनें आपली सुटका करून घेऊन ती चंडीकडे जायला निघाली. त्या पुढचा हा कथाभाग.

"तूं काय बरळते आहेस हें तुला तरी कळतं आहे काय ? राजकन्ये, एका सामान्य घटनेचा एवढा मोठा बाऊ करून, जीव संकटांत घालून अशा या भयाण रात्रीं तूं इथपर्यंत आलीस याबद्दल तुझें कौतुक करावं, कीं तुझा निषेध करावा कांहींच कळत नाहीं !"

"सामान्य घटना ? चंडी, ज्या घटनेमुळें माझा जीव वेडापिसा झाला, मला अनेक मनस्ताप भोगावे लागले, संकटें पार करावीं लागलीं, आणि अखेर वचनपूर्ति करण्यासाठीं मी इथपर्यंत आलें, ती सामान्य घटना ? अधिक प्रस्तावनेची गरज नाहीं आणि तेवढा मला अवधीहि नाहीं. तुला 'स्त्री चरित्र' पाहायचं होतं ना ? ही पाहा मीं आलें आहें. तुझ्या मनांतलं चित्र तुला पुरं करायचं होतं ना ? मग आतां वेळ कां लावतोस ? चल आटप लवकर !" तिचा आवाज मोठा होत जात होता. विलक्षण आत्मविश्वासानें ती बोलत होती तिला काय उत्तर द्यावें हें चंडीला सुचेना तो गोंधळून गेला. यांतून सुटका कशी करून घ्यावी हें त्याला उमगेना त्याच्या तोंडांतून शब्द फुटेनासा झाला. तो घामाघूम झाला. त्याची ती अवस्था मदनरेखेच्या लक्षांत यायला वेळ लागला नाहीं मध्यरात्र उलटत चालली होती. या नंतर पुढें ब्रह्मराक्षसाशीं सामना होता. अजून तो बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली

"हें काय चंडी, तूं अजून गप्पच ? अरे रात्र संपायच्या आंत मला पति-दर्शनाला हजर झालें पाहिजे, चल आटप लवकर. तुला भीति वाटायचं कांही कारण नाहीं. माझ्या पूज्य पतीला मी सारा इतिहास सांगितलेला आहे. त्यांना फसवून मीं आलेलें नाहीं. कुठलेहि अन्य विचार तुझ्या डोक्यांतून तूं काढून टाक, आणि पुढें आलेल्या संधीचा फायदा घे. चल उचल पाऊल लवकर !"

आतां मात्र तिला कांहीं तरी उत्तर देऊन वाटेला लावलें पाहिजे होतें; पण तें निश्चित काय द्यावें हेंच त्याला कळेना. आजपर्यंत अनेक सभा त्यानें आपल्या पांडित्याच्या जोरावर जिंकल्या होत्या, गाजवल्या होत्या. महान महान पंडितांना निरुत्तर केलें होतें. आपल्या वाक्चातुर्यानें निष्प्रभ केलें होतें; परंतु आतां तो स्वतः

( पानें ४४ वर चालू )

**पा णी – पु री**

# डॉक्टरलाच पाजलेले डोस !



— डॉ. वि. रा. पाटणकर

[ माझ्या डॉक्टरी व्यवसायांतील कांहीं मित्रांचा हा अनुभव नव्यानें धंदा करणाऱ्या डॉक्टरांना वा इतरांना कदाचित् मार्गदर्शक ठरेल—मनोरंजक तर निश्चितच ठरेल. यांतील नांवें मात्र काल्पनिक आहेत. बाकी इतर सर्व सत्य. ]

## : १ शुभ मुहूर्तावर कुलूप लावलं !

डॉ. क. र. नाईक,
सावंतवाडी. ३-६-१९४३

मी सरकारी नोकरी इमानेइतबारें करणारा डॉक्टर आहे. माझ्या हाताला यशहि आहे. त्यामुळें माझ्याकडून बरे होऊन गेलेले पेशंट जेव्हां मला परत भेटतात तेव्हां ते मला विचारतात, "डॉक्टर, तुम्ही आमच्या गांवीं स्वतंत्र प्रॅक्टीस कां करीत नाहीं ? खोऱ्यान पैसा ओढाल, मोटार ठेवाल...आणि आम्हां लोकांनाहि बरं वाटेल..."

मी त्यांना कांहीं उत्तर न देतां नुसतं स्मित करतों. फारच तर दोन कप चहा मागवतों आणि परत माझ्या उद्योगास लागतों.

एम्. बी. बी. एस्. झाल्यावर उमेदीच्या पहिल्या भरांत मी इकडनं तिकडनं पैसे गोळा करून दवाखाना थाटला होता व स्वतंत्र धंदा सुरू केला. गडी—कंपाउंडर—सारं कांहीं होतं. नव्हते फक्त पेशंटस् ! आणि कांहीं दिवसानंतर माझ्याकडे एक केस आली. यशाची पहिली पायरी गांठल्याचा मला आनंद झाला. पण तो आनंद फारच अल्पकाळ टिकला. त्याचं असं झालं—

मी ती केस काळजीपूर्वक तपासली व त्यास दवापाणी चालू केलं. दिवसांतून दोन दोनदां ( न बोलावतां ) पेशंटच्या घरीं जाऊं लागलों. वेळप्रसंगीं रोग्यास स्पंजहि करूं लागलों. ( आणि इथंच माझें चुकलं-डॉक्टर पेशंटची काळजी घेण्याऐवजीं स्वतःचीच जाहिरात करतोय असा त्या लोकांचा ग्रह झाला. )

पांचव्या दिवशीं मी पेशंटच्या घरीं जातों तोंच वरांतून दुसरा डॉक्टर बाहेर पडतांना मी पाहिला. माझी केस दुसऱ्या डॉक्टरकडे गेली होती. नुसती केसच नव्हे तर बीलहि. मी जेव्हां रोग्याच्या भावाकडे बिलाचे पैसे मागितले तेव्हां तो हिः हिः करून म्हणाला, "डॉक्टर, पैसे कसले ? तुमच्या ट्रीटमेंटमुळें केस स्पॉईल झाली व





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आम्हांलाच शंभर रुपये जास्त खर्च आला." त्याचं पुढचं बोलणं ऐकायला मी तिथं थांबलोंच नाहीं. तडक दवाखान्यांत आलों. तोच शुभ मुहूर्त समजून दवाखान्यास कुलूप लावलं व सरकारी नोकरीची कास धरली.

## २ कसं काय बरं आहे ना !

डॉ. अ. रा. पुरोहित,
मालवण, ता. २-३-१९४५

मी दवाखान्यांत आल्यावर नेहमीच्या सरावाप्रमाणें रोग्यांना "कसं काय बरं आहे ना !" असं विचारतों. रोगीहि मग "डॉक्टर जरा कमी आहे" असं आहे, तसं आहे वगैरे वगैरे सांगतात आणि हंसतखेळत औषध देत-इंजेक्शन देत मी त्या रोग्यांना परत पाठवतो.

पण त्या दिवशी माझ्याकडे जे सद्‌गृहस्थ आले होते ते थोडे जादा होते. त्यांनी दोन दिवस माझ्याकडून औषध नेलं होतं. केस मलेरियाची होती. नेहमीच्या सरावाप्रमाणें मी त्यांना विचारलं, "कसं काय बरं आहे ना ?"

"हं-तसं आतां बरं वाटतय् पण—"

"पण काय ? थंडीवाजून ताप येतो का ?"

"छेः छेः तापबीप नाहीं. पण मला जें बरं वाटतंय् तें केवळ तुमच्या मिक्श्चरमुळें नव्हें. त्याबाहेर माझेहि उपाय चालू आहेत. मी × × × डॉक्टरकडून इंजेक्शन घेतलं शिवाय फार्मसितून गोळ्याहि घेतल्या—" त्यानें आपल्या प्रचंड ज्ञानाचं प्रदर्शन केलं.

"फारच छान ! माझं भाग्य मोठं म्हणून आपली पायधूळ माझ्या दवाखान्यास लागली—" न राहवून मी बोललों. व त्याला साभार परत पाठवला.

जर का त्याला कांहीं कमीजास्ती होतं तर कायद्याच्या दृष्टीनें मी गुन्हेगार होतों. कारण त्याची केस मी ट्रीट करीत होतों ना' आपल्या जादा शहाणपणामुळें आपणाला 'कांहीं कमी जास्त झालं ! हें त्यानें (वकिलाच्या सल्ल्यानुसार) कोर्टांत कबूल केलं नसतं.

## ३ आपुलें बंधन पाहिलें म्यां डोळां

डॉ. कु. ल. कारेकर
सातारा, ४-३-१९४३

रात्री बाराचा सुमार होता. अमावास्येची रात्र ती काळीकभिन्न होती. अशावेळीं माझा दरवाजा ठोठावण्यांत आला. कुणीतरी आजारी असेल—एखादी बाई असेल अशा समजुतीनें डोळे चोळीत मी दार उघडलं तोंच काळोखांत उभे असलेल्या पांचसात जवानांनी माझ्यावर झडप घातली, माझ्या तोंडांत बोळा कोंबला. डोळे बांधलें, चांगली गठडी वळली आणि मला उचलून घेऊन ते चालू लागले.

हें आहे तरी काय ? स्वप्न कीं सत्य ! मी मला चिमटा घेतला तेव्हां कळलं कीं हें स्वप्न नसून सत्य आहे. मला हे नेताहेत तरी कुठं ? मला पळवण्यांत यांचा उद्देश काय ? यांना माझ्या पैसे हवेत कीं आणखी कांहीं ? कीं एखादं कुकर्म करण्यासाठीं यांना माझ्या वैद्यकीय ज्ञानाची जरूरी आहे ? मी विचार करून करून डोकं शिणवीत होतों पण उत्तर मिळत नव्हतं.

कांहीं वेळानंतर मला जमिनीवर उभं करण्यांत आलं व मला मोकळं करण्यांत आलं. आणि एका म्हातारीजवळ मला नेलं. त्यांच्या प्रमुखानं "ही बरी होईल का ?" म्हणून मला विचारलं. मी तिला तपासलं तेव्हां ती मृत झाल्याची आढळलं व माझं मत मी त्यांना सांगितलं. लगेच मघाच्याच रितीनं त्यांनी मला परत घरी पोचवलं.

मागाहून कळलं की ते सुप्रसिद्ध 'पत्रि' सरकारचे लोक होते.

> **प्रिय वाचक—**
>
> सर्व सामान्यांच्या जीवनांत केव्हां केव्हां अतर्क्य अशा घटना घडतात. या घटना पुष्कदां विनोदी—आणि विलक्षण असतात. अशा घटना आपल्याहि आयुष्यांत घडल्या असतील त्यांतील कांहीं अविस्मरणीय घटना अगर प्रसंग सुमारे ३०० ते ४०० शब्दांत लिहून पाठवा. भाषेची फिकीर करूं नका. त्यावर योग्य ते संस्कार करूं.
>
> सर्व लेखनाला मानधन दिलें जातें.

● ● ●

(पान ४३ वरून चालू)

अडला होता. हतबल झाला होता. आपल्या कोरड्या ओठावरून जीभ फिरवत अडखळत तो म्हणाला.

"रेखे त्यावेळीं माझ्या विचित्र मनःस्थितीमुळें मीं तसा वागलोही असेन. तूं मला क्षमा करून ती गोष्ट विसरून जायला पाहिजे होतंस; पण तूं जिद्दीला पेटलीस, आणि एवढं मोठं दिव्य करायला तयार झालीस. जा तूं परत जा ! माझ्यावर तुझे अनंत उपकार होतील. अग, आश्रमवासी जागे झाले आणि राजाच्या कानावर उद्यां ही गोष्ट गेली तर परिणाम विपरीत होतील !"

"भ्याड, चंडी तूं भ्याड आहेस ! त्यावेळीं आपल्या पौरुषाच्या घमेंड्या मारून 'तुझं स्त्रीचरित्र मला पहायचं आहे' असं म्हणतांना तुला लाज वाटली नाहीं. आतां अशी गुळमुळीत उत्तरं देऊन मला वाटेला लावायचा तुझा विचार मला कळत नाहीं असं का तुला वाटतं ? चंडी, आपण हरलों आहोत हें कबूल करायला शरम कां वाटावी ? स्वच्छ सांग, कीं तूं हरला आहेस. माझं वचन मीं पूर्ण केलेलें आहे. तुझ्या मनांतलं चित्र पुरं करायची ताकद तुझ्यांत नाहीं !"

"कबूल राजकन्ये मदनरेखे एकदम कबूल. मीं हरलों आहें, एवढंच नव्हे, तर मीं भुईसपाट झालों आहें हें कबूल करतों. अग, परस्त्री म्हणजे माता. प्रत्यक्ष मातेला तिच्या मुलानें मीं हरलों असें म्हणण्यांत अपमान मानण्याचं कारण नाहीं. मीं हरलों आहें असें मीं त्रिवार म्हणतो. ज्यांनीं ज्यांनीं परस्त्रीकडे पापी दृष्टीनें पाहिलं त्यांचा अधःपात झाला. आणि ज्यांनीं माझ्या मनांतल्या सारखं चित्र पुरं करण्याचा प्रयत्न केला ते भगांकित झाले. चौदा चौकड्यांचा राजा रावण, तो तर वैभवासकट


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

नामशेष झाला. इंद्र, चंद्र कलंकित झाले. आणखी असे कितीतरी दाखले देतां येतील. आणि माझ्यासारख्या संन्याशाला परस्त्री म्हणजे जगन्माते समान ! भारतीय संस्कृति आपल्याला हेंच शिकवते !

" संन्याशी ? "

" होय मी संन्याशी झालों, रेखे, मी संन्याशी झालों आहे. वचनपूर्ति करण्याकरितां केलेल्या दिव्याबद्दल मी तुझं कौतुक करतों. तुझ्याबद्दलच्या आदरानें माझं मस्तक सदैव नम्र होत राहील. माझ्या मुळें केवढं मोठं दिव्य करावं लागलं तुला, किती त्रास सहन करावे लागले ! शिव शिव.! परमेश्वरा मला क्षमा कर. हे जगन्माते मला क्षमा कर ! "

असें म्हणून चंडीनें तिला साष्टांग नमस्कार घातला. मदनरेखेचें हृदय कळवळलें. तिनें त्याच्या दोन्ही भुजांना धरून त्याला उठवला. वात्सल्यानें एकवार त्याच्याकडे दृष्टिक्षेप टाकला. आणि मागें फिरून घोड्यावर टांग मारून ती तिथून वायुवेगानें निघाली.

\+ × × +

ती राक्षसाजवळ पोंहोचली त्यावेळीं राक्षस घोरत पडला होता. तिची वाट पाहून तो कंटाळला होता. आतां ही कसली परत येते ? या विचारानें तो स्वतःशींच हंसला होता. आतांपर्यंत त्यानें कुणालाच असें मोकळें सोडलें नव्हतें. वायदा तर केलाच नव्हता. ती गोष्ट त्याच्या कोषांत नव्हती. सांपडला त्याला भक्षण केला असेंच आजपर्यंत होत आलें होतें. राजकन्येच्या हांका त्याच्या कानांवर पडल्या आणि त्याला जाग आली. त्यानें तिच्याकडे निरखून पाहिलें; तां तिचा चेहरा एका वेगळ्याच समाधानानें चमकत असलेला त्याला दिसला.

" ही पहा मीं तयार आहें. तुला दिलेल्या वचनाप्रमाणें मी हजर झालेलें आहे. थोडासा उशीर झाला याबद्दल मला क्षमा कर ! तुझ्या क्षुधेची आग जास्त भडकली असेल. आतां वेळ लावूं नकोस मला खाऊन तुझी भूक शांत कर ! " मदनरेखा म्हणाली.

ही मानवी स्त्री, त्यांतून राजकन्या, आपल्याला अशा अटव्य रानांत रात्रीची सांपडते काय, आपण तिला वचन देऊन तात्पुरती सोडतों काय, आणि ती दिलेल्या वचनाला जागते काय, स्वतःला खा म्हणते काय सारेंच विपरीत होतें.

" राजकन्ये, तूं प्रियकराला भेटून आलीत असं कांहीं मला वाटत नाहीं. प्रियकर भेटीची इच्छा तृप्ती तुझ्या मुखावर मला दिसत नाहीं. एकतर तूं अर्ध्या वाटेकरून भिऊन परत आली असावीस; किंवा तुला प्रियकर भेटला नसावा; अथवा त्याच्याशीं तुझं कडाक्याचं भांडण तरी झालं असावं. काय झालं तरी काय ? तुझी हकिकत ऐकून नंतरच मीं काय करायचें ते ठरवीन. मला सारं खरं खरं सांग ! "

" ऐक राक्षसा, माझा जन्म यज्ञापासून झालेला आहे. "

" यज्ञापासून ! "

" हो ! निपुत्रिक अशा माझ्या वडिलांनीं पुत्रकामेष्टि यज्ञ केला आणि एक कन्या व एक पुत्र अशीं दोन अपत्यें यज्ञदेवतेनें राजाला दिलीं. " अशी सुरुवात करून, पुन्हा एकदां राक्षसाला तिनें आपली सारी हकिकत सांगून झाल्यावर ती म्हणाली, " चंडीनें आर्यधर्माला जागून मला माता मानलं; इतकंच नव्हे तर जगन्माता म्हणून माझ्या चरणावर त्यानं आपलं मस्तक ठेवलं. माझ्या समोर एक फार मोठा प्रश्न उभा होता. मतिभ्रष्ट होऊन चंडीने आल्या संधीचा फायदा घेऊन मला भ्रष्ट केलं असतं, तर मी तिथेंच आत्मनाश करून घेतला असता; पण सुदैवानं तसं झालं नाहीं. त्यानं मला जगन्माता म्हणून नमस्कार केला. तेंच समाधान माझ्या चेहऱ्यावर तुला दिसलं. असो ! आता तुझी क्षुधा शांत कर. आणि माझ्या आत्म्याला शांति दे ' "

परंतु हें सारं ऐकायला ब्रह्म राक्षस जागा होता कुठें ! त्याचें शरीर घट्ट झालें होतें. बधीर झालें होतें. हळूहळू त्याच्यांतलें राक्षसत्व निघून जात होतें. कांहीं वेळानें तो खालीं वांकला. त्यानें मदनरेखेला दोन्हीं हातांच्या तळव्यावर घेतली आणि तिला आपल्या मस्तकावर बसवून तो म्हणाला.

" राजकन्ये मदनरेखे आज माझा उद्धार झाला. ' यज्ञापासून उत्पन्न झालेली एक स्त्री अवचित येऊन तुझा उद्धार करील. ' असा उःशाप मला मिळाला होता. तो योग आज आला. शंभर वर्षांनीं आला. तुझीच वाट मीं पाहात होतों. जगन्माते, मला क्षमा कर. अजाणपणें मीं तुला घाबरविलें. तुला धमक्या दिल्या. चल आतां तुझ्या राजवाड्यांतल्या महालापर्यंत मीं तुला सोबत करतों. तुम्हां उभयतां पति-पत्नीच्या चरणांवर मस्तक ठेवून मीं स्वस्थानीं निघून जाईन. असें म्हणून तो तिच्याबरोबर निघाला.

\+ + +

त्या वेळचे राजे हे खरोखरीचे राजे होते. नुसते नांवाचे राजे नव्हते. दिलेलें वचन पूर्ण करण्यासाठीं—अवंतीच्या राजकुमार जयसेनानें स्वतःच्या पत्नीला ' मदरेखेला ' उदार हृदयानें आयुष्यांतल्या त्या पहिल्याच महन्मंगल रात्रीची, स्पर्श केल्याशिवाय शय्यागृहाबाहेर जाऊं दिली. त्या महान् दिव्यांतून राजकुमारी सुखरूप परत येईल अशी त्याची खात्री होती. फुलांनीं बहरलेला मंचक अजून टवटवीत होता. त्यांतल्या एकाहि फुलानं मान खालीं घातली नव्हती. सुवास अजून दरवळून राहिला होता. महालांतलें दीप तेज मंदावलें नव्हतें. जोंपर्यंत यांतली एकहि गोष्ट अजून मालवत नाहीं तोंपर्यंत राजकन्या सुखरूप आहे, अशी त्याची निष्ठा होती. रात्र संपायला अजून थोडाच अवधी होता. इतक्यांत घोड्यांच्या टापांचे आवाज राजकुमाराला ऐकूं आले. गवाक्षांतून बाहेर पाहून राजकुमार जयसेनाने सुटकेचा एक दीर्घ निःश्वास सोडला.

पतीच्या चरणावर मस्तक ठेवून मदनरेखेनें क्षमा याचना केली तिला अडवून जवळ घेत, राजकुमार जयसेन म्हणाला, " मदनरेखे तूं सामान्य स्त्री नाहींस यज्ञ देवतेची पुत्री आहेस. महान संकटांतूनहि तूं सहज तरून जाशील, तुझ्याबरोबर असलेला हाच का तो ऋषिकुमार ? "

" नाहीं राजेश्वरा हा ऋषिकुमार नसून मी उद्धरलेला एक ब्रह्मराक्षस ! "

असें म्हणून तिनें सारा इतिहास आपल्या पतिला सांगितला. पुनश्च दिव्य देह पावलेल्या त्या ब्रह्मराक्षसानें जयसेन आणि मदनरेखेच्या पायावर मस्तक ठेवून लोटांगण घातलें आणि आशीर्वाद घेऊन तो निघून गेला.

प्रभुकृपेनें राजा जयसेन आणि राणी मदनरेखा यांनीं पुढें सुखानें राज्य केलें.

**— समाप्त —**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट




- उध्वस्त विश्व — बाळ सामंत
- सुरस जंगलकथा — श्रीकृष्ण टाकूर
- शब्द-चित्ररेखांकन — सतीश

**उध्वस्त विश्व**

## अनामिका

महाराष्ट्राचे एक अग्रगण्य कथालेखक श्री. अरविंद गोखले यांचा हा तेरावा कथासंग्रह. गेलीं १३ वर्षे गोखले सातत्यानें आणि विपुल कथालेखन करीत आहेत. या शर्यतींत त्यांच्याबरोबरची कांहीं मातबर मंडळी आतां मागें पडल्यासारखी झाली आहेत. त्यांतली कांहीं मंडळी जितक्या झपाट्यानें आघाडीवर आली तितक्याच झपाट्यानें मागासली. गोखल्यांनीं कोणत्याहि प्रकारें प्रशंसेचा अगर प्रसिद्धीचा भलाबुरा मार्ग न अवलंबितां निष्ठेनें साहित्यसेवा चालविली आणि अजून कोणत्याहि तऱ्हेनें त्यांच्या कथालेखनाची उंची अगर आंतरिक दर्जा ढासळलेला आहे असें नाहीं तर पूर्वीच्याच जोमानें मराठी कथेवर नवनवे प्रयोग करण्यांत ते यशस्वी झाले आहेत.

प्रस्तुतच्या अनामिका या संग्रहांत गोखल्यांनीं वाचकांना एका वेगळ्या विश्वाचें अंतर्भेदी दर्शन घडविलें आहे. ' भकास व भरभराटीचें जग ' त्यांनीं वेगळ्याच शैलींत चित्रित केलें आहे. आजपावेतों वेश्यांच्या जीवनावर ' मराठींत अत्यंत सांकेतिक आणि वेगडी चित्रण झालें आहे. त्यांतील अनुभूति कृत्रिम आणि फसवी होती. आणि म्हणूनच या संग्रहांत सादर केलेल्या गोखल्यांच्या नायिका वाचकांच्या जिवाला चटका लावणाऱ्या आहेत. एका उध्वस्त जीवनाचें एवढें सर्वस्पर्शी आणि सूक्ष्म चित्रण मराठी भाषेंतच काय पण देशी भाषेंत अपूर्व आहे.

आपल्या कथाविषयाशीं गोखले समरस झाले आहे. ज्या विश्वांत देहविक्रय हा एक मामुली व्यवहार मानला जातो अशा ठिकाणींहि गोखल्यांसारख्या संस्कारक्षम लेखकाला टिपून घेण्यासारखें पुष्कळच आढळलें. सुसंस्कृत पांढरपेशा जीवनांतील नकली आणि वापरून झिजवट झालेलीं जीवनमूल्यें या भकास जीवनांत वापरली जात नसून माणूसकीचा गहिवरहि या माणसांच्या बाजारांत कसा आढळतो याचें हें चित्रीकरण वाचकाला अनेक वेळां अस्वस्थ, व्यथित करील यात वाद नाहीं. " पानं वाटणारी वाटेवरची मी वेश्या नाहीं. मी अब्रूदार घाटण आहें. पानं नाहीं, पण पायतणं देईन " असे पैशाहूनहि अति मोलाचे बोल एका पानवाल्यास ऐकवणारी तेजस्वी स्त्री यांत आपल्याला दिसते. वेश्याबाजारांत दलाली करणारा बुड्ढा आपल्या दहा वर्षांच्या पोराला त्याच धंद्यांत घालायला तयार नाहीं तर ' तुळजा ननावरेची कर्मकहाणी ' वाचून उदास झालेला वाचक—" ती भेटेल त्याला एकच विनवते आहे कीं माझी तान्ही आतां मोठी झाली आहे. वयांत आली आहे. सावत्र आईकडे अडकून पडली आहे. अन् ती बया आहे बदचालीची वेसवा ! ती माझ्या लेकीला बिघडवील, नासवील तिला सोडवायला हवं. माझ्या पोटच्या पोरीला वांचवायला हवं " हा टाहो ऐकून अधिकच विमनस्क होतो. एका वेश्येचा हा आक्रोश काळीज पिळवटून टाकणारा आहे तर एका सिनेमा नटावर फिदा झालेल्या आणि त्यानें नासवलेल्या एका अश्राप अनामिकेची कहाणी आपलं अंतःकरण विदीर्ण करते.

या उध्वस्त आणि भयाण जगांतहि गोखल्यांना कांहीं बुद्धिमान स्त्रिया भेटल्या. त्यांतील कुसुंबी ही (कथा) अशीच चटका लावणारी आहे या कुसुंबीला गोष्टी ऐकण्याचं वेड आहे. " तें पुरवायला तिनं वाचनाचं वेड लावून घेतलंय. दिसेल तें वर्तमानपत्र, मासिक, रहस्यकथा ती हावरेपणानें वाचते. खूप दमलेली असली अगर दारु पिऊन थकून गेलेली असली कीं पलंगाखालीं ठेवलेलीं दोन पुस्तकं काढते. हार्डीची टेस व खय्यामच्या रुबाया ! त्यांतलं तिला किती व काय कळलं असेल कुणास ठाऊक ! पण धर्मग्रंथाच्या भक्तिभावानं कुसुंबी ती पुस्तकं जपते, व वारंवार वाचून काढते....ती कुमार्गाला गेली नसती तर प्रोफेसुर झाली असती. "

कुसुंबीच्या मैत्रीला उशागतच्या बकुळीच्या हाराची उपमा देऊन गोखल्यांनीं आपल्याला ' एरुशा ' या अशाच हृदयस्पर्शी व्यक्तिरेखेची ओळख करून दिली आहे. आपल्या प्रियकराचा मुलगा चुकून आपल्या वेश्यागृहांत आल्यावर एरुशाच्या पूर्वस्मृति चाळवतात. पंचवीस वर्षांपूर्वी आपण डेव्हीडची लग्नाची मागणी कशी नाकारली—" अशी पोकळी निर्माण झाली म्हणून ती शाळेंतून घरीं न परततां एका इसमाच्या मागें गेली व अखेर वेश्यागृहांत दाखल झाली. अशी पोकळी तयार झाली म्हणून ती डेव्हिडकडे न जातां नाचगृहांत तरुणातरुणी भोंवती भिरभिरली—"

वासनेच्या किळसवाण्या प्रदर्शनांतहि माणूस आपल्या उराशीं जीवनांतील कांहीं तेजःपुंज मूल्यें कशीं उराशीं बाळगून असतो याचा प्रत्यय ' एरुशा ' करून देते. ' वरात ' या कथेंत तर एका वेश्यागृहांतील मुलीरस्त्यांतून लग्नाची वरात, डोळ्यांतलं पाणी पिळवटलेल्या आंतड्यांत ढकलीत पाहात होत्या—त्यांचा या दृश्यानें शृंगार फिकटलेला पाहून त्यांची मालकीण म्हणते, " निर्लज्जासारखी वरात कसली बघत बसलांत ? कधीं बघितली नाहींत का धिंड ?—तें बँडचं गाणं आपल्याकडच्या प्लेटींत आहे कीं ! अन् नवरानवरीचं सोंग काय पाहायचं कपाळाचं ? अग देवब्राम्हणाला साक्ष ठेवून आगलेली बया ती नवरी म्हंजे ! बांधून घेतलेली रखेलीच !.....अन् तुम्हाला सांगतें पोरींनों, त्या त्याया वरातीमागून



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

संभावितपणें चालल्या होत्या ना पांढरी लुगडीं नेसून नि काळे झगे घालून त्या आतां घरीं जातील नि आपल्या यजमानांना शरीरं देतील तुमच्यासारखीं ! तुमच्यापेक्षां सावकारी हिशोबानें."

अरविंद गोखल्यांनीं चित्रित केलेल्या साऱ्या अनामिका मराठी वाचकांच्या हृदयाला घरें पाडतील. त्यांचं मस्तक क्षणभर सुन्न करतील.

कारण एका आगळ्या आणि विचित्र जगाचें हें रेखाटन सर्वच अर्थानें अपूर्व आहे. फारां दिवसांनीं एक चांगला आणि दर्जेदार कथासंग्रह वाचल्याचें समाधान वाचकांना लाभेल अनामिका वाचून !

—बाळ सामंत

* *

## सुरस जंगलकथा—

## कारवारचा काळूराम

आजकाल मराठींत चटकेदार ललित साहित्य फार-दुर्मिळ झालंय. कंटाळवाण्या नवकथा आणि ठरीव ठशाच्या गोष्टी यांच्या बुजबुजाटांत भानू शिरधनकर लिखित कारवारचा काळूराम ही जंगलकथा वाचकांचे कांहीं क्षण नक्कीच आनंदांत घालवील. आज मराठींत जंगलाच्या पार्श्वभूमीवर साहसकथा जवळ जवळ नाहींतच. शिकारकथा नामक वाङ्मयप्रकार आतां मंदावलाय. कारण शिकारी आणि लेखक असा दुर्मिळ योग सांप्रत मराठींत नाहीं. त्यामुळे स्टोनहॅम या इंग्रजींतील गाजलेल्या कसदार लेखकाच्या एका अजोड कलाकृतीचा हा सुरस स्वैर अनुवाद पुन्हा पुन्हा वाचण्याइतका रसरशीत आणि जिवंत वठला आहे. काळूराम या वाघाची ही दर्दभरी कहाणी आमच्या विद्यार्थी वाचकांच्या हातीं निःशंकपणें द्यायला कांहींच हरकत नाहीं. उलट अशा तऱ्हेच्या इंग्रजी वाङ्मयाचे अनुवाद आमच्याकडे व्हायला पाहिजेत आणि हें काम भानू शिरधनकरांनीं अवश्य अंगावर घ्यावें. एक छानदार प्रकाशन सादर केल्याबद्दल अभिनव प्रकाशन संस्थेच्या चालकांचें अभिनंदन !

— श्रीकृष्ण ठाकूर

● ● ●

## शब्द-चित्ररेखांकन —

## विलायती वारी

[ लेखक : ज्ञानेश्वर नाडकर्णी; मनीषा प्रकाशन, अमर भुवन, मुंबई ७, रेखा-चित्रांसह पृष्ठें १३० किं. ७॥ रु. ]

विलायतेला जातांना 'फेस्टिव्हल ऑफ ब्रिटन' हें एकावन सालचें इंग्लंडमधील प्रचंड प्रदर्शन पाहणें हा एक हेतु बाळगण्याइतक्या भाग्यवंत ठरलेल्या थोर कलाप्रेमी विद्यार्थ्याची ही 'शब्द चित्रां'ची डायरी आहे. दोन वर्षांच्या वास्तव्यांत या विद्यार्थ्यानें तिथे भराभर भरून घेतलेल्या अनेक चिजांची ही अक्षरशः 'परदेशी पोतडी' आहे. तेथील चित्र-शिल्पादि कला, नाटकें आणि रंगभूमि, संगीत आणि साहित्य,— उच्च जीवनांतील हे सर्व विशेष ज्ञानेश्वर नाडकर्णींनीं विद्यार्थी सुलभ आधाशीपणानें पाहिल्याची आणि टिपल्याची उत्कृष्ट साक्ष हें पुस्तक देतें. रोजच्या रोज जें नित्य नवें इंग्लंड त्यांनीं तिथें पाहिलें तें तसेंच्या तसें टिपून 'मौज' साप्ताहिकाकडे पाठवलें. त्याचा हा एकत्रित संग्रह सोबत जोडलेलीं छायाचित्रें व स्वतःचींच रेखाचित्रें यांच्यामुळें चांगलाच वजनदार बनला आहे.

तिथें पाहिलेलीं नाटकें, चित्रें, माणसें, वास्तु, प्रदर्शनें, हॉटेलें, संस्था यांचें त्यांनीं घडवलेलें दर्शन, प्रत्येकामागची अभ्यासपूर्ण पार्श्वभूमि आणि स्वतःची खुसखुशीत टीका यांनीं समृद्ध बनलेलें आहे. पाहिलेल्या नाटकाचा कर्ता, त्याच्या ईतर नाटकांच्या संदर्भात येणारी तुलना, प्रयोग, स्टेज, सेटिंग्ज, नटसंच, दिग्दर्शक आणि नेपथ्य, प्रकाशयोजना, प्रेक्षक या सर्वांची झटपट ओळख नाडकर्णी अत्यंत थोड्या शब्दांत करून देतात, आणि थोडक्यांत ब्रिटिश रंगभूमीचा इतिहास व परंपरा यांच्यावर अधिकारवाणीनें बोलण्याचा मक्ता प्राप्त करून देतात. आणि इकडच्या रंगभूमिप्रेमिकांना घेण्यासारखेंहि नकळत खूप सांगून जातात.

शेक्सपियरचें गांव, ऑक्सफर्ड–केंब्रिज विद्यापीठें, कँटरबरीची यात्रा, वगैरे गांवांच्या प्रवासांत इंग्लिश जीवनाची घरीं–दारीं–मार्गी होणारी अंतर्बाह्य ओळख नाडकर्णींनीं तेथील चालीं, गडूं, तीळ आदी मुद्रां अत्यंत तन्मयतेनें पटवून दिलेली आहे. त्यांच्या विद्यार्थीसुलभ दृष्टांतून सहसा कांहीं सुटत नाहीं याचा वारंवार प्रत्यय येतो. स्कॉट पोलर रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें आल्यावर ध्रुवसंशोधक स्कॉटसंबंधींच्या प्रदर्शनांतून एस्किमो लोक, त्यांचीं घरें, बर्फ आदींवर त्यांनीं चक्क भूगोलाचा संक्षिप्त धडा लिहून ठेवला आहे— अर्थात् मोठ्या मुलांसाठीं

या विविध-वस्तु-चित्रदर्शनाच्याच सार्थी अत्यंत इरसाल नमुने, कहाण्या, हकीकती, चुटके, गंमती, चुटचुटक्या आणि चुटपुट लावणाऱ्या आठवणी चौकटी-चौकटींतून भरलेल्या आहेत. जड संगीतानें डोकें जड होतेंच असें वाटलें, तर पटकन् यांतल्या एखाद्या 'भावगीता'चा आश्रय घ्यावा अशा 'लाइट' धर्तीची चौकटचित्रेंच आहेत.

आजच्या काळांत नाडकर्णींच्या बोजड आणि अनेकदां अ-मराठी वाटणाऱ्या भाषेचें मूळ या 'विलायती वारी'त कुठें कुठें सांपडतें. (त्यांतला खुसखुशीत भाव मात्र आज बराच प्रौढ झालाय !) 'विलायती वारी' हें नांवच घ्या ना 'पंढ-पूरची' वारी न म्हणतां 'पंढरपुरी' वारी म्हटलें तर काय होईल ? पण या प्रवासवर्णनांत ही भाषा तितकीशी बोचत नाहीं. त्याचें मुख्य कारण नाडकर्णींची इथें आढळणारी जागृत आणि तरल विनोदबुद्धि.

मुंबईच्या एका कॉलेज-विद्यार्थ्यानें दोन वर्षे डोळे, कान आणि मन भरून पाहिलेल्या इंग्लंडचा हा रेखाचित्रांपासून 'चौकट चित्रां'पर्यंत विविध कोनांतून करून दिलेला परिचय निःसंशय कौतुकास्पद आहे. मराठींतील प्रवासवर्णनांत त्याचें स्थान अगदीं वेगळें आहे. उच्च दर्जाच्या आणि रसिक वृत्तीच्या मराठी माणसाच्या संग्रहांत या पुस्तकाला मानाचें स्थान आहे.

—सतीश

* *

या सदराकरितां प्रकाशकांनीं आपल्या प्रकाशनाच्या नेहमीं दोन प्रति पाठवाव्यात. निश्चित अभिप्राय द्यायला त्यामुळें अडचण होत नाहीं.

—सं.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



• 'मौज'ची इतिश्री • अल्पायुषी छंद • ठाकऱ्यांचा 'सार्मिक' • कै. कृष्णराव मराठे • महाराष्ट्र काँग्रेसची पुनर्रचना • नागपूरचें महत्त्व • पिकासो • गायनाचार्य विष्णू दिगंबर पलुस्कर • महाराष्ट्र दर्शन • हलकी फुलकी आकाशवाणी.

## साहित्य

### 'मौज'ची इतिश्री

वृत्तपत्रीय जगांतील गेल्या महिन्यांतील एक महत्त्वाची घटना म्हणजे ३९ वर्षे चाललेल्या मौज साप्ताहिकाची एकाएकीं इतिश्री. गेले कांहीं महिने मौज प्रकाशन संस्थेतर्फे चालणाऱ्या सत्यकथा आणि मौज यापैकीं कोणतेंतरी एक लवकरच बंद होणार अशा वावड्या उडत होत्या. अखेर त्यांतील वयोवृद्ध अशा मौजेनें वाचकांना कायमचा निरोप घेतला ! चाळीस वर्षांच्या काळांत मौजेंत अनेकवार बदल झाले. काल बंद झालेल्या मौजेनें दहा वर्षांपूर्वी आकार धरला. या काळांत साप्ताहिकांची चलती होती आणि त्यांत मौजेचें खास वैशिष्ट्यपूर्ण असें स्थान होतें. विशेषेकरून मौज साप्ताहिकाचा दिवाळी अंक हें एक दिवाळीचें खास आकर्षण होतें. पुढें मोजेची छपाई फारच रेखीव आणि सुबक झाली पण मौजेचा दर्जा खालावूं लागला. 'डाक्याची मलमल, गिरण्यांचें कापड बाजारांत येतांच मागें पडलें' अशी तक्रार या संदर्भात साधनेनें केली आहे. हें विधान खरें असलें तरी मौज आणि साधना हीं कांहीं डाक्याच्या मलमलीच्या तोडीची साप्ताहिकें नव्हत. उलट दैनिक वृत्तपत्रांच्या साप्ताहिक आवृत्त्यांना गिरणी कापडाची उपमा देणाऱ्यां या साप्ताहिकांपेक्षां कितीतरी पटीनें चांगला आकर्षक आणि योजनापूर्वक मजकूर त्या दैनिकांच्या साप्ताहिकांनीं पुरवला आणि म्हणूनच ही उच्चभ्रू मंडळी झपाट्यानें मागें पडली. नीरसता, भोंगळपणा, आणि पायघोळ संपादन हें मौजेला भोंवलें. 'उच्च' असा छाप मारून घेऊन इतरेजनांकडे तुच्छतेनें पहायचें आणि आपणच आपल्या गोतावळ्यातील क्षुद्र लोकांची पाठ कंटाळा येईपर्यंत थोपटायची हेंहि उच्च धोरण मौजेला नडलें. साधनें अनुकूल असतां परिश्रमाचा आणि चोखंदळ संपादनाचा अभाव हेहि मौजेच्या इतिश्रीचें एक कारण मानावें लागेल. साप्ताहिकांनीं माणसें जोडायचीं असतात—पण मौजेनें टाइप चांगला जोडला—आणि माणसें मात्र मोडलीं. वाङ्मयांतील कंपूशाही विरुद्ध प्रचार करण्याला निघालेल्या या 'रसिक महाराष्ट्राच्या' साप्ताहिकानें आपली अशी कांहीं जोरदार कंपूशाही निर्माण केली कीं तिचा सर्वसामान्य वाचकालाहि उबग यावा. आणि यामुळें अनेक सज्जन साहित्यिक विनाकारण दुखावले गेले आणि दुर्जन चांगलेच मातले.

मौजकारांना राजकीय बूड नव्हतें आणि त्यामुळें राजकीय झंझावाताच्या झपाट्यांत मौजेला आपलें आसन टिकवतां आलें नाहीं. कदाचित वाङ्मयीन बैठक असलेल्या मौजेच्या संपादकांना राजकारणाचें सामान्य ज्ञानहि नसल्याचा तो परिणाम असेल. कारण त्यामुळें मौजेंत संपादक मित्रांचा जो पक्ष तो मौजेचा पक्ष अशी विनबुडाची अवस्था झाली आणि त्यामुळें मौजेचें तारू भरकटत गेलें, तें गेलें.

असो. पण कांहीं झालं तरी चाळीस वर्षांची मौज अशी बंद पडायला नको होती. वृत्तपत्रांना चाळीशींत तारुण्य येतें तर मौजेला पस्तीशी उलटतांच अकालवृद्धत्व आलें. तरी पण या कालखंडांत मौजेचीं अशी कांहीं खास वैशिष्ट्यें होतीं. त्यांतलें एक म्हणजे परीटघडी छपाई. दुसरं म्हणजे मौजकार आणि त्यांचा गोतावळा यांची मौजछाप चमत्कारिक भाषाशैली. मौजेचा चावट, चावरा आणि क्वचित्प्रसंगीं बालीश असा पत्रव्यवहार, आणि दर महिन्याला न चुकतां भेटीला येणारें मौजेचें राशीभविष्य !'

### अल्पायुषी 'छंद'

'दोला' या काव्यसंग्रहामुळें गाजलेले कवि आणि अर्थशास्त्राचे नामांकित प्राध्यापक प्राचार्य पु. शि. रेगे यांच्या मार्गदर्शनाखालीं निघणारें 'छंद' नामक चिमुकलें मासिक अल्प काळांतच अखेर बंद पडलें आहे. गेल्या महिन्यांत निघालेल्या छंदच्या अखेरच्या अंकांत संपादकांनी वाचकांचा निरोप घेतला आहे. 'अभिरुचि' या बडोद्याच्या दर्जेदार आणि ठसठशीत अशा बहुगुणी मासिकाच्या पावलावर पाऊल टाकून 'छंद' निर्मिति करण्यांत आली. पण अभिरुचीची सर छंदला आली नाहीं. उलट सुरवातीला कांहीं चांगलें साहित्य दिल्यानंतर छंद नीरस आणि निर्जीव बनूं लागलें. मासिक अखेर वाचकांसाठीं असतें नि त्यामुळें जगत असतें याचें छंदच्या संपादकांनीं अवधान राखलें नाहीं. आणि त्यामुळें आपल्याबद्दल कांहीं अपेक्षा निर्माण करून त्या पूर्णपणें पुऱ्या न करतां छंदनें निरोप घेतला आहे. अर्थात् आजकाल वाचकांचीच अभिरुचि बिघडली आहे आणि दर्जेदार प्रयत्नांना वाव नाहीं असा ठराविक ठशाचा आरोप करण्याचा 'पडेल मंडळींना' वाव आहे ही गोष्ट अलाहिदा !



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

## ठाकऱ्यांचा ' मार्मिक '

प्रबोधनकार ठाकऱ्यांचे चिरंजीव आणि सुप्रसिद्ध व्यंगचित्रकार श्री. बाळ टाकरे यांच्या संपादनाखालीं केवळ व्यंगचित्रात्मक असें मार्मिक नामक एक साप्ताहिक गेल्या महिन्यांत प्रसिद्ध झालें. शंकर्स विकलीच्या धर्तीवर मराठी साप्ताहिक काढण्याचा उपक्रम अभिनंदनीय आहे यांत शंकाच नाहीं. एक उत्तमपैकीं व्यंगचित्रकार म्हणून ठाकऱ्यांनीं नांव मिळवलें आहे. आतां ते संपादनाच्या क्षेत्रांत उतरले आहे. पण नुसत्या व्यंगचित्रावरच मासिक वा साप्ताहिक चालणार नाहीं. त्याला चुरचुरीत आणि खेळकर लिखाणाची जोड पाहिजे. आणि अशा तऱ्हेचें हुकमी लिखाण लिहिणारे लेखक मराठींत हाताच्या बोटावर मोजण्याइतकेहि नाहींत. बांदेकरांच्या मागून त्यांची जागा भरून काढणारा सिद्धहस्त विनोदी लेखक मराठींत नाहीं हें त्यांच्या निधनानंतर निघालेले नवयुगचे सर्व अंक पाहातां सिद्ध होतें. त्यामुळें संपादक ठाकऱ्यांनीं अशा प्रकारचें विनोदी लेखन करणारे नवे लेखक शोधून काढले पाहिजेत आणि 'मार्मिक'ची वाचनीयता वाढवली पाहिजे. आणि हें जमलें तर 'मार्मिक' वाचकांत लोकप्रिय होईलच.

## कै. कृष्णराव मराठे

धंद्यानें यंत्रविशारद, पोशाखानें आणि मतानें सनातनी असलेल्या आणि वाङ्मय फौजदार म्हणून लोकप्रियता मिळविलेल्या कृष्णराव मराठ्यांचें निधन झालें. दरवर्षी दिवाळी अंकांतील अश्लील वाङ्मय हुडकून काढून आयतेंच वाचकांच्या समोर ठेवण्याची कामगिरी दरवर्षी तें नियमितपणें पार पाडत. पण गेल्या चार दोन वर्षांत सोज्वळ असें वाङ्मयच हुडकून काढण्याची त्यांच्यावर पाळी येऊं लागली, तरी पण कृष्णराव मराठ्यांनीं आपला हट्ट सोडला नाहीं. त्यांनीं कीर्ति मिळविली ती 'ब्रँडीची बाटली' या चित्रपटाच्या वेळीं. 'अश्लील वाङ्मयाचा निषेध' करण्याचा त्यांचा नाद त्यांना जन्मभर पुरला. राजकारणांत जसें 'थत्ते' तसें वाङ्मयांत कृष्णराव मराठे. दर वर्षी साहित्य संमेलनांत अश्लील वाङ्मयाविरुद्ध तावातावानें भांडणारे कृष्णराव मराठे आतां यापुढें दिसणार नाहींत त्यामुळें वाङ्मयसेवकांस यापुढें चुकल्या चुकल्यासारखे वाटेल.

— पिनाकि



## महाराष्ट्र काँग्रेसची पुनर्रचना

महाराष्ट्रांतील राजकीय दृष्ट्या एक महत्त्वाची घटना म्हणजे मुंबई वगळून महाराष्ट्रांतील सर्व विभाग-काँग्रेसकमिट्यांचें एकीकरण केलें गेलें. आज तूर्त तरी मराठी राजकारणांत विदर्भाचें पारडे जरा जड असल्यामुळें विदर्भातील एक वयोवृद्ध काँग्रेस कार्यकर्ते डॉ. गोपाळराव खेडकर यांची अध्यक्ष म्हणून निवडणुक झाली. महाराष्ट्र काँग्रेसचे जुने अध्यक्ष राजारामबापू पाटील आणि जुने चिटणीस श्री. हरिभाऊ वर्तक यांची या नव्या काँग्रेस कमिटीचे चिटणीस म्हणून नेमणूक झाली आहे. मात्र काँग्रेसची कचेरी मुंबई येथेंच ठेवण्यांत आली आहे. आज मुंबई शहरांत मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटीचें बरेंच मोठें प्रस्थ आहे आणि शहरांतील सर्व क्षेत्रांतील संस्था आणि व्यक्ति यांच्याशीं तिचे निकट संबंध आहेत. उद्यां महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसला मुंबई प्रदेश काँग्रेसची भूमिका घ्यावी लागणार, कारण कालांतरानें मुंबई प्रदेश काँग्रेसचा सवतासुभा गुंडाळण्यांत येण्याचा दाट संभव आहे. अशा परिस्थितींत महाराष्ट्र प्रदेश काँग्रेसला मुंबई शहरांत आपलें बस्तान नीट बसविण्याचें अवघड कार्य करावयाचें आहे. यशवंतराव चव्हाणांच्या नेतृत्वाखालीं हेंहि अवघड कार्य प्रदेश काँग्रेसला सुलभ जाण्यास हरकत नसावी.



सासुबाई, बोलताहेत!!

## नागपूरचें महत्त्व

वर्षांतून एकदां महाराष्ट्र विधानसभेचें अधिवेशन नागपूर येथें भरविण्याचा आणि कांहीं काळ महाराष्ट्र सरकार नागपूरला हलविण्याचा सरकारनें निर्णय घेतला आहे ही स्वागतार्ह घटना. द्विभाषिक विसर्जनानंतर नागपूरची परिस्थिति बिघडली आणि विदर्भवासियांचीं मनें शंकाकुल आणि विचलित झालीं ही घटना सत्य. विदर्भातील जनतेच्या मनांतील स्वतंत्र विदर्भाची सुप्त इच्छा दडलेली आहे. पण विदर्भाच्या प्रगतीच्या दृष्टीनें विदर्भानें महाराष्ट्रांतच गुण्यागोविंदानें राहाणें कसें इष्ट आहे हे अर्थमंत्रि श्री. शेषराव वानखेडे यांनीं आवर्जून सांगितलें आहे. सत्तारूढ नेत्यांचीं हीं भाषणें म्हणजे विदर्भी जनतेचा कौल नव्हे. तथापि कांहीं सामंजस नेत्यांचे दूरदर्शी विचार या दृष्टीनें स्वागतार्ह. आणि म्हणूनच नागपूरचें ऐतिहासिक आणि राजकीय महत्त्व जागृत ठेवण्यासाठीं वर्षांतून एकदा तरी विधानसभा नागपूर येथें हलविण्याचा सरकारनें घेतलेला हा निर्णय अभिनंदनीय. हलके हलके नागपूरकर मंडळींचा जुन्या महाराष्ट्रविभागांतील लोकांच्याबाबत असलेला अविश्वास आणि किंतु यामुळें दूर होईल अशी आशा.

— विष्णु शर्मा

## सत्यं. शिवं. सुंदरम्

### पिकासो

पाब्लो पिकासो हा ७९ वर्षें वयाचा महान् कीर्तीचा जागतिक चित्रकार म्हणजे चित्रकलेच्या दुनियेंतील एक अपूर्व नवलाई आणि चमत्कृति. विसाव्या शतकांत पिकासोनें आपल्या विलक्षण आणि दुर्दम्य प्रतिभेनें चित्रकलेचें रंगरूप बदलून टाकलें आणि टीकाकारांना वारंवार आश्चर्याचे धक्के दिले. आपल्या तरुण वयांत अत्यंत संस्कारक्षम आणि भावविवश असलेला हा थोर चित्रकार, पुढें भावनेला मागें सारून बुद्धीला आवाहन करता झाला तेव्हां टीकाकार विस्मित झाले. गेल्या महिन्यांत लंडन येथें भरलेल्या त्यांच्या






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

वैचित्र्यपूर्ण चित्रप्रदर्शनांतहि त्यानें आपला एकांडेपणा आणि वैचित्र्यपूर्णता अभंग राखली आहे. कांहीं टीकाकारांच्या मतें पिकासोसारखा असाधारण प्रतिभेचा चित्रकार म्हणजे आधुनिक युगाची एक महान देणगी आहे तर कांहींच्या मतें पिकासोची कला म्हणजे रंगाची निष्कारण उधळपट्टी आहे. पण एक गोष्ट मात्र निश्चित कीं वयाच्या ७९ व्या वर्षीहि पिकासो नवी क्षितीजें धुंडाळण्यांत आणि नवे नवे प्रयोग करण्यांत गर्क आहे. आणि या त्याच्या उत्तुंग प्रतिभाशाली निर्मितीनें आजचें चित्रकलाविश्व भारून टाकलें आहे. त्यामुळें हर्बर्ट रीड सारखा जातिवंत टीकाकार अगदीं थोडक्यांत- पण मार्मिकपणें पिकासोबद्दल म्हणतो —

"......apart from these encesses there is a body of work of almost endless variety. The abounding energy which it reveals will alone be evidence of genias, for only a wiseman, as Blake would say, could so persist in his folly.

—नवरंग

• •

## सत्पुरुष गायनाचार्य — 'विष्णु दिगंबर पलुस्कर'

अनेक प्रकारचीं व्यसनें, छांदिष्टपणा व लहर यामुळें प्रतिष्ठित समाजानें आपल्यांतून वगळलेल्या, बहिष्कृत केलेल्या, हीन मानलेल्या आणि आपल्या करमणुकीपुरतें राबविलेल्या कलावंताला त्या काळांत त्यांतच सुख वाटायचें. आपल्या या दयनीय अवस्थेबद्दल विचार करायला खुद्द कलावंताला तरी वेळ कुठें होता ? साधना आणि नशा या व्यतिरिक्त दुसऱ्या जगाची त्याला माहितीच नव्हती. ती असण्याची जरूरी नव्हती, वा पर्वाहि नव्हती. सर्कशींतल्या जनावरागत जगणें यांतूच त्याला सुख वाटायचें.

इज्जतदार लोक केवळ आपल्या मनरंजनापुरतेच समानता दाखवून खांद्यावर हात ठेवीत; परंतु हें मनरंजनाचें कार्य संपलें आणि व्यवहाराच्या जगांत ते वावरायला लागले, कीं कलावंत या व्यक्तीला ते आपल्यापासून चार हात दूरच ठेवीत. कलेला त्याकाळीं फक्त राजाश्रय होता. लोकाश्रय देखील फार मोठा आहे, किंबहुना राजाश्रयाहून त्याचें मूल्य अधिक आहे याची कलावंताला जाणीव नव्हती. १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत ही परिस्थिति होती; परंतु या परिस्थितीचें अभेद्य कवच फोडून ज्या महाभागानें व्यसनाच्या गर्तेंत निद्रिस्त असलेल्या कलेला अंधारांतून प्रकाशाकडे खेंचून आणलें, व बहुजन समाजांत तिला मानाचें स्थान प्राप्त करून दिलें त्या महाराष्ट्रीय सत्पुरुषाचें नांव विष्णु दिगंबर पलुस्कर.

### परिश्रम

कुरुंदवाडच्या एका कीर्तनकाराच्या कुळांत त्यांचा जन्म. लहानपणीं फटाके उडवतांना एकाएकीं झालेल्या अपघातामुळें दृष्टि अधू झाली. केवळ कीर्तनाची परंपरा पुढें चालवण्याकरितां म्हणून संस्थानाधिपतींच्या कृपेनें दरबार-गायक बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांकडे गाण्याच्या प्राथमिक शिक्षणाला सुरुवात केली. आपल्या कुशाग्र बुद्धीनें आणि चोख सेवाभावानें गुरुकृपा संपादन केल्यानें गुरुंचें ज्ञानभांडार खुलें झालें. तसा गळा जड होता; पण खडतर मेहनत केली शेजाऱ्यांना त्रास होऊं नये म्हणून एका पडक्या घराचा आश्रय घेऊन रोज दहा दहा, बारा बारा तास रियाज केला व आवाजाला मनमानी वळवायची संवय लावली. आपल्या एका गुरुबंधूनें स्वतःच्या गुरुचा केलेला गुरुदक्षिणेचा दर्जेदार सन्मान पाहून स्वतःहि कांहीं तरी केलें पाहिजे अशा ईर्षेनें अर्थार्जन करण्याकरितां संस्थानांतून पहिल्यानेंच बाहेर पडले. साताऱ्याला एका ब्राह्मणवकिलाकडे चार तास गाऊन फक्त दहा रुपये दक्षिणा मिळाल्यानें मनस्ताप झाला. यापुढें कुणाला 'गाणें ऐका' म्हणून म्हणायचें नाहीं. (त्या काळांतली परिस्थिति तशी होती) याचना करायची नाहीं असा दृढ निश्चय करून देशांतराला बाहेर पडले. यापुढें गायचें तर देवासमोर. गांवांतल्या किंवा शहरांतल्या देवळांत फक्त; परंतु सूर्यावर अभ्रें आलीं म्हणून त्याचें तेज थोडेंच लपणार ? बडोद्याला गेले असतां तिथल्या रसिकांत प्रचंड नांव झालें. खुद्द राणी सरकारांनी सन्मानानें पाचारण करून गौरव केला. पुढें राजकोटच्या गिरनार पर्वतावर एका सिद्ध पुरुषाचें दर्शन झालें. त्यांनीं पंजाबांत जाऊन संगीताचा प्रचार करण्याचा सल्ला दिला, व आशीर्वाद दिला. या सिद्ध पुरुषाच्या आशीर्वादानें सर्व गोष्टी सुलभ होत गेल्या. ग्वाल्हेरला 'पंडित' ही उपाधी मिळाली.

### अहंतेचा निरास

इथपर्यंत फार मोठा नांवलौकिक झाला होता; परंतु अलिगढ येथें एका नापितानें 'ध्रुपद' गाऊन दाखवून 'स र ग म' सकट त्या ध्रुपदाची शास्त्रशुद्ध चर्चा केली. तेव्हां आपल्यांतल्या उणीवांची पंडितजींना जाणीव झाली. व त्या उणीवा दूर करण्याकरितां पुनश्च अध्ययनाला सुरुवात केली. त्यासाठीं संस्कृत ग्रंथांचा शोध घेतला पाहिजे होता. म्हणजे पर्यायानें संस्कृताचेंहि अध्ययन करावें लागलें. तसें अध्ययन पायाशुद्ध करण्यासाठीं मथुरेंतील संस्कृत पंडितांच्या सान्निध्यांतहि पंडितजींना राहावें लागलें. व उत्खनन करून स्वरलिपी तयार केली. त्या स्वरलिपीसाठीं अतोनात श्रम करावे लागले; परंतु पंडितजींनीं त्याची पर्वा केली नाहीं.

पुढें जालंधर, अमृतसर, लाहोर, काश्मीर, भरतपूर आदि सर्वत्र उत्तर हिंदुस्थानांत पंडितजींचें नांव झालें.

### पहिलीं संगीत पाठ्य-पुस्तकें

इ. स. १९०१ मध्ये लाहोर येथें त्यांनीं गांधर्व महाविद्यालयाची स्थापना करून, त्याला लागणारीं पाठ्य पुस्तकें, संगीताचा इतिहास, नियम, शास्त्र, आदि विषयांची चोख तजवीज केली. विकानेर येथें मिळालेल्या कांहीं ग्रंथांच्या आधारावर स्वरलिपीचीं चिन्हें कायम करून तीं चीजांसहित पुस्तकरूपानें प्रसिद्ध करणारे पंडित पलुस्कर हे पहिले संगीत ग्रंथ प्रकाशक होत. इथेंच त्यानीं 'संगीत बालबोध' या नावाचें संगीत प्रचाराचें एक मासिकहि सुरू केलें. हीं सर्व कामें चालू असतांना आसपासच्या मुलखांत पंडितजी आपल्या गांधर्वमहाविद्यालयाच्या प्रचारार्थ एक छोटें भाषण करीत, पत्रकें वाटीत, लोकांच्या मनांतील किंतु काढून टाकण्यासाठीं त्यानीं अपार प्रयत्न केले. पुढें कराची, अमृतसर, दिल्ली इत्यादि शहरांत गांधर्व महाविद्यालयाच्या शाखांची स्थापना करीत करीत पंडितजी मुंबईत आले. आणि सँडहर्स्ट रोडवर स्वतःच्या म्हणजे गांधर्व महाविद्यालयाच्या इमारतींत संस्थेचें








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कार्य सुरू झालें. विशेष हा होता कीं पारसी, मुस्लीम, इंग्रजी, इराणी आदि सर्व जातींत हिंदुस्थानी संगीत पद्धतींची आवड उत्पन्न होऊन गांधर्व महाविद्यालयाला एक विषाल असें स्वरूप आलें. अखेर पंडितजींनी आपल्या परात्पर गुरूंना—बाळकृष्ण बुवांना—इथें मुंबईत आणून राजासारखी त्यांची बडदास्त ठेवली. आणि इतर कुणाहि शिष्यापेक्षां अधिक मोलाची गुरूदक्षिणा दिली.

## महान कार्य

केवळ लोकरंजनाचेंच कार्य पंडितजींनीं केलें नाहीं तर असहकार आणि वंग-भंगाच्या आंदोलनांत देशगौरवाचीं गाणीं गात, स्वातंत्र्याच्या प्रचारासाठींहि त्यांनीं आपल्या गाण्याचा उपयोग केला. भारतीय काँग्रेसच्या प्रत्येक अधिवेशनांत 'वन्देमातरम्' हे राष्ट्रगीत गायचा मान पंडित विष्णु दिगंबर पलुस्करांनाच मिळायचा. 'रघुपतिराघव राजाराम' हें भजन अखिल भारतांत पंडितजीमुळेंच लोकप्रिय झालें. महात्मा गांधींना हें भजन इतकें आवडायचें कीं त्यासाठीं पलुस्करांच्या एका शिष्याला त्यांनीं आश्रमांत कायमचें ठेवून घेतलें होतें. व या भजनाला आश्रम भजनावलींत पहिल्या श्रेणीचें स्थान दिलें होतें.

पंडितजीचें घराणें कीर्तनकाराचें त्यामुळें पुढें पंडितजींनीं कीर्तनांतून संगीत प्रचाराचें कार्य करायला सुरुवात केली. संत तुलसीदासांच्या रामायणांतली रामकथा गात त्यांनीं पुन्हां हिंदुस्थानभर प्रवास केला.

हिंदुस्थानांत अनेक थोर गवैय्ये होऊन गेले. हरिदास, मिया तानसेन, बैजु बावरा, स्वामी, सदारंग, अदारंग, रहिमतखां वगैरे; परंतु अफाट शिष्यसांप्रदाय आणि संगीत कलेला लोकाभिमुख केली ती पंडित पलुस्करांनींच; आणि म्हणूनच या पुण्य-पुरुषाची ठिकठिकाणीं पुण्यतिथी साजरी केली जात आहे.

—गोपालन्

• • •

## •महाराष्ट्र दर्शन

राष्ट्रसेवादलाच्या कलापथकानें दिल्लींत याजवलेल्या 'महाराष्ट्र-दर्शना'च्या कार्यक्रमाचे नुकतेच चार 'हाउसफुल' प्रयोग मुंबईत केले. महाराष्ट्राच्या तेजस्वी इतिहासाचे ओजस्वी भाषेंत थाटनें चित्रण करणारा नेत्रदीपक कार्यक्रम अशी जाहिरात करून व तिकिटें संपली आहेत असें रान उठवून हौशी रसिकांच्या खिशाला भरपूर खार लावणारा हा कार्यक्रम एकंदरीत भोंगळच वाटला. सबंध कार्यक्रमांत खड्या आवाजाचे असे एक दोन कलावंतच घाईघाईनें विदूषकी पोशाख करून पुन्हां पुन्हां डोकावत होते तें पाहून पन्नास कलावंतांपैकीं उरलेले बिनगळ्याचे अठ्ठेचाळिस फक्त गर्दी करण्यासाठींच जमवले होते असें प्रेक्षकांस वाटलें. ज्ञानेश्वर, शिवाजी, टिळक, रानडे इत्यादिकांचें जें स्लाईडस्नीं दर्शन घडवलें त्यापेक्षां कितीतरी चांगले फोटो जनतेच्या परिचयाचे आहेत. छायाकृतींत 'नाठाळाच्या माथा काठी हाणणारा' तुकारामाचा आवेश अगदींच होतकरू वाटला. आणि डाव्या हातांत तंबोरी व उजव्या हातांत चिपळ्या धरणारे त्याचें व्यक्तिमत्व अगदींच घरेलू वाटलें. रामदासाचा अवतारहि पाहून तर शिवरायांची कींव आली. रंगमंचावर लाडिक पुरुषी आवाजांत अधूनमधून प्रसंगोपात मिसळलेल्या वीरश्रीचा आविष्कार नव्या मनूच्या शूर शिपायांच्या मेळाव्यानें परिपूर्ण दाखवला. तीन तासांच्या ह्या भरगच्च कार्यक्रमानें प्रेक्षकांच्या बैठकीची, नेत्रांची आणि सहनशीलतेची एकंदरित कमाल पराकाष्ठा गांठली. हौशी कलावंताची होतकरू कला, सबंध कार्यक्रमाचें विस्कळित संकलन आणि एकेका प्रसंगाची कुवतीनुसार केलेली सजावट ह्यांनीं ह्या तथाकथित स्फूर्तिदायक कार्यक्रमाला अगदींच भोंगळ बनवून प्रेक्षकांना बावळट ठरविलें आहे. दिल्लीकरांना असलें कांहीं पहायला मिळालें नव्हते त्यामुळें ते खूष होणें प्राप्त होतें; पण ज्या महाराष्ट्रीय जनतेला मराठी वाङ्मय, जीवित, व संस्कृति ह्यांचा परिचय पिढीजाद आहे त्यांच्यासमोर असलें प्रयोग करणें जरासें धाष्ट्र्याचें ठरतें. सेवादलाच्या मदतीचें निमित्तच असलें तर त्यासाठीं श्री. लीलाधर हेडग्यांचे कार्यक्रम व प्रस्तुत कार्यक्रमांतले चांगले बसवलेलें 'कुणी नाहीं कुणी नाहीं', कोळ्यांचे गाणें, इत्यादि निवडक प्रसंग योग्य तऱ्हेनें संकलित करून दाखवले तर करमणूक व सांस्कृतिक दर्शन यांचा योग्य मिलाफ होईल. नाहींपेक्षां दिल्लीला नेलेल्या ताफ्याच्या हौशीपायीं आलेली खोट वसूल करण्यासाठीं सामान्य मध्यमवर्गीय रसिकाला हौसेपायीं भूर्दंड भरावा लागणें इतपतच ह्या कार्यक्रमाचें प्रस्थान ठरतें.

## हलकीफुलकी आकाशवाणी

डॉ. केसकरांनीं जनतेच्या विविध टीकेला मान तुकवून आकाशवाणी सर्वांत हलकीफुलकी करण्याची घोषणा नुकतीच केली आहे. गेल्या वर्षांत आकाशवाणीच्या कार्यक्रमांवर होतकरू व बुजुर्ग टीकाकारांकडून इतकी टीका झाली कीं त्यामुळें अनेकांनी आकाशवाणीचें अस्तित्व उमगलें. केवळ दिवाणखान्याची शोभा म्हणून ठेवलेला रेडिओ ऐकण्यास आधीं पुष्कळांना वेळच नसतो, आणि तो लावलाच तर हरदासी हिंदीचे पाठ, गांधीस्मरण, नाहीं तर बालचंद्राचें भवितव्य असल्या मनावर व कानावर ताण देणाऱ्या कार्यक्रमाच्या तडाख्यांत श्रोता सांपडतो. पुष्कळदां 'काळ थोडा आणि सोंगें फार' होऊन एखादा आकर्षक कार्यक्रम गुंडाळला जातो. कार्यक्रमाला मोबदला द्यावा लागतो व त्याचेहि आंकडे कलावंत फुगवून मागत असल्यामुळें हौशी कलावंत व मुद्रिका ह्यावरच आधारून कार्यक्रम आंखावे लागतात. संगीताच्या बाबतींत जुन्या घराण्याचे कलावंत वृद्धापकाळामुळें अगर घसा धरल्यामुळें पेन्शनींत गेलेले आहेत. कांहींच्या शागीर्दांनी दुसऱ्या घराण्यांत घरठाव केलेला आहे तर कांहीं घराणीं भग्नशेष झालेलीं आहेत. ह्या परिस्थितीमुळें तासभर दमछाट संगीत सुनावणारे कलावंत मिळणें आकाशवाणीला आज कठीण झालें आहे. अशा अडचणींतच सिलोन, व पाकिस्तान रेडिओच्या सिनेमासंगीताची लोकप्रियता भारतीय आकाशवाणीला जास्त मारक ठरली. सार्वजनिक संस्था ही जणुं काय आपल्याच मालकीची आहे असें मानून तिच्यांतल्या उणीवांवर प्रच्छन्न व प्रगट टीका करणारे वावदूक आज पावसाळी छत्र्याप्रमाणें पानोपानीं प्रगट झालेले आढळतात. त्यांत कांहींची पोटदुखी तर कांहींचे अपचन ह्या टीकांत अधूनमधून जाणवते. आकाशवाणीच्या बाबतींत तर ही








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सवंग टीका रकाने भरभरून आजकाल प्रसिद्ध होत आहे. "हा कार्यक्रम जड तर हा हलका, हा होतकरू तर हा अत्याचे" असे पदोपदीं ध्वनित होत असतांना बिचाऱ्या केसकरांनीं व त्यांच्या सहाय्यक खातेदारांनीं काय करावें? तरिसुद्धां मध्यम मार्ग पत्करून सुगम संगीताचे उपक्रम सुरू करून टीकेला थोडा लगाम घालण्याचा प्रयत्न केला. पण हा उपक्रम हास्यास्पद ठरला आहे. ऱ्हस्व-दीर्घ कानावेलांटी ह्यांचें भाषिक ज्ञान नसणाऱ्या कलावंतानें नवनवीन चालीवर आळवलेलीं हीं गीतें ऐकणाऱ्याला अधिकच हैराण करतात असा अनुभव येत आहे. बेसूर, बेताल व बेशिस्त गायन म्हणजेच जर सुगम संगीत म्हणायचें तर सध्यां चाललेला घोळ आदर्श ठरेल. सरकारी बंधनांत जखडलेल्या श्रवणसाधनेला एखादा रसिक निर्माता जोपर्यंत लाभत नाहीं तोपर्यंत इष्टुर-फाकड्याच्या बाजारबुणग्या सेनेप्रमाणें भरती केलेल्या 'स्टाफ आर्टिस्ट' कडून चमत्कार घडतील अशी अपेक्षा करणें निरर्थक आहे.

— सारस्वत

* *

## साहित्य-स्वीकार

- मराठ्यांचें सिंहासन (नाटक)
  लेखक—गो. कृ. मुंगशीकर
  नागविदर्भ प्रकाशन, अमरावती.
- कोल्होबाची करामत
  लेखक—व. कृ. वऱ्हाडपांडे
  नागविदर्भ प्रकाशन, अमरावती.
- जमिनीवरचीं माणसं (कथा)
  लेखक—शांताराम
  महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती.
- कलाविमर्श
  लेखक—बाळकृष्ण दाभाडे
  ग. ल. ठोकळ प्रकाशन, पुणें.
- संगीत जयचौंद्र (नाटक)
  लेखक—कारंडे गुरूजी
  सुभाष प्रकाशन, मुंबई २१.
- उत्तर ध्रुव (कथा)
  लेखक—श्री. ज. जोशी
  मनोरंजन प्रकाशन, मुंबई ७.
- तुका झालासे कळस
  लेखक—रा. कृ. जोशी
  कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे.
- पंचमहाल
  लेखक—वि. वा. जोशी
  नागपूर प्रकाशन, नागपूर.
- माझं लहानपण
  सं. पंडित अनंत कुळकर्णी
  कुळकर्णी ग्रंथागार, पुणें.
- मी भटकत आहे
  लेखिका—वसुंधरा पटवर्धन
  कुळकर्णी ग्रंथागार, पुणें.
- शब्दांच्या दुनियेंत
  लेखिका—शांता शेळके
  कुळकर्णी ग्रंथागार, पुणें.
- यशवंतरावजी चव्हाण
  लेखक—रंजन परमार
  ठोकळ प्रकाशन, पुणें.
- तळमळ (काव्य)
  लेखक—गोविंद नन्नोरे
  शशी प्रकाशन.
- अभिनव केकावली (काव्य)
  लेखक—मयुरात्मज
  निशिकांत करकरे, भोपाळ.
- भक्तिचा मळा
  लेखक—शं. गो. तुळपुळे
  कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें.

• • •




लवकरच प्रसिद्ध होत आहे!

चि ★ त्रां ★ ज ★ ली

(अर्थात भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें)

गेलें वर्षभर दीपावली मासिकांतून प्रसिद्ध झालेलीं 'भारतीय संस्कृतीचीं प्रतिकें' ही रंगीत चित्रमाला आतां पुस्तक रूपानें प्रसिद्ध होत आहे. त्यांत बारा रंगीत चित्रें, दुर्मिळ अशा अनेक शिल्पांच्या रेखाकृति, आणि प्रत्येक चित्रावरती माहितीपूर्ण ललितभाष्य.

साईज डेमी, मोहोरेदार कागद, आर्ट पेपरवरील चित्रछपाई.

प्रकाशक: दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, कॅनेडी ब्रिज, मुंबई नं. ४.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट

# हरवलेलें चिठोरें



—अ. ह. लिमये

[ डचेस ऑफ विंडसरच्या आयुष्यांतील एक अविस्मरणीय प्रसंग. ]

मनुष्याच्या जीवनांत असे कित्येक प्रसंग येतात कीं ज्यावेळीं महत्त्वाच्या घटनांकडे लक्ष देतां देतां किरकोळ नि लहानश्या घटनांकडे आपलें दुर्लक्ष होतें नि सर्व प्रकरण फसतें अथवा फसण्याचा संभव निर्माण होतो. कोर्टांत जातांना आपण सर्व कागदपत्रें नीट पाहून घेतो पण चष्मा बरोबर घेण्याचें आपण विसरतों. बँक बंद होण्याच्या वेळीं आपण वेळेवर पोहोंचतों पण डिपॉझिटची पावती घरींच रहाते. घोड्याचा नाल न पाहिल्यामुळें लढाई हरण्याची भीति निर्माण होते. नाटकाला नि सिनेमाला धांवत पळत जावें नी तिकिटें कोठें ठेवलीं तें ध्यानांत येत नाहीं. अशावेळीं त्या व्यक्तीची मनःस्थिति अत्यंत विकल होते. हें विस्मरण मोठ्यांच्या जीवनांतहि होतें नि त्याचे पडसाद खूप दूरवर पोहोंचण्याचा संभव असतो. युद्धकाळांत तर अगदीं बारीकसारीक तपशीलांची काळजी घ्यावी लागते. ड्यूक ऑफ विंडसरच्या राज्य त्यागाची वेळ. डचेस ऑफ विंडसरनें इंग्लंड सोडण्याचें ठरविलें. आपल्या पतीसंबंधींचें वृत्त व राज्यत्यागासंबंधींच्या घडामोडी कळून घेण्यास त्या अत्यंत आतुर होत्या नी तें साहजिकच होतें. पण या बाबतींत अत्यंत गुप्तता बाळगणें अवश्य होतें. त्यांच्या पाठलागावर बातमीदार होतेच. त्यांनां चुकवून हा सर्व प्रवास त्यांना करावयाचा होता. टेलिफोन हें बोलण्याचें एकमेव माध्यम त्यांच्याजवळ होतें. पण हें साधन अत्यंत काळजीपूर्वक वापरण्याची वेळ आली होती. कारण त्यांच्या बोलण्यांतील एखादें वाक्य जरी कोणाच्या कानांवर पडलें असतें तरी पराचा कावळा होण्यास वेळ लागला नसता. डचेस अत्यंत अस्वस्थ होत्या. थोड्या वेळांत सर्व बोलणें करणें भाग होतें. टेलिफोनचें सहाय्य वारंवार मिळण्याजोगें नव्हतें. थोडक्या वेळांत सर्व बोलणें आवश्यक होतें. एकादा मुद्दा सांगावयाचा राहिला तरी घोटाळा होण्याचा संभव होता. अशा वेळीं एक घटना घडली. ती त्यांच्या आत्मचरित्रांत त्यांनीं दिली आहे. आणि ती त्यांच्याच शब्दांत ऐकण्यांत गंमत आहे.

त्या म्हणतात—

"आमच्या बोलण्याचा दुसऱ्या कोणाला अर्थबोध होऊं नये म्हणून आम्हीं आपापसांत एक सोपीशी सांकेतिक भाषा ठरविली होती. ड्यूकला मी 'मिस्टर जेम्स्' असें संबोधावयाचें असें आम्हीं ठरविलें होतें. लॉर्ड पेरी ब्राउन्लो हे या प्रवासांत मजबरोबर होते. टेलिफोन येईतों मी एका कागदाच्या चिठोऱ्यावर टिपणें करीत बसलें होतें. सांगण्याजोगा असा एकहि मुद्दा विसरूं नये ही माझी इच्छा होती ना. टेलिफोनवरून डेव्हिडचा (ड्यूथ ऑफ विंडसर) आवाज धडपणें ऐकूं येई ना. मोठ्यानें बोलण्याची चोरी. मीं केलेल्या टिपणांची मीं वारंवार उजळणी करीत होतें. एखादा मुद्दा राहिला तर! परंतु शेवटीं शेवटीं मला ओरडावें लागलें. पेरी बाहेर उभा राहून अमचें बोलणें कोणी ऐकत आहे कीं काय हें बारकाईनें पहात होते.

पुष्कळ वेळां असं होतं कीं आपल्याला आपल्या मनांतले सर्वच्या सर्व विचार दुसऱ्याला सांगावेसे वाटतात. पण कांहींतरी अडचणी येतात नीं आपला तो प्रयत्न सफळ होत नाहीं. मीं मोठ्यानें ओरडूनही डेव्हिडला माझें बोलणें ऐकूं येईना. अखेर कंटाळून मीं फोन बंद केला. पुन्हां केव्हांतरी बोलणें करूं. शिवाय सर्व टिपणें जवळ होतींच आम्हीं थोडेसें खाल्लें नी पुढें निघालों.

आम्हीं सरासरी पांचसहा मैल गेलों असूं. मला काय वाटलें कोण जाणे. मीं माझीं टिपणें हॉटेलमधील टेलिफोनच्या खोलींतच विसरल्याचें मला आढळून आलें. माझा कोट, मनीबॅग यांत मीं शोध घेतला. टिपणें कोठेंच नव्हतीं. "कांहीं विसरलंय वाटतं?" पेरीनें विचारलें. त्याला जणूं कांहीं माझी चेष्टा करायची लहर आली होती. "तीं टिपणें, मला वाटतें टेलिफोनजवळच तीं टिपणें राहिलीं" मीं उद्विग्नतेनें उत्तर दिलें. ऑनरलोना खरी चीड आली. ते म्हणाले—"एखाद्या बावळट बाईसारखें तुम्हीं वागलांत असं म्हणावसं वाटतं. नी मीं तसंच म्हणणार. आतां खरी पंचाईत आली कीं नाहीं? आपण परत गेलों कीं आपल्याला लोक ओळखणार. नी जें आपण टाळत आहों तें फसणार. नी जर तीं टिपणें कोणाला सांपडलीं तर वृत्तपत्रीय जगांत किती गहजब उडेल, वॉलिस, याची तुम्हांला कल्पना आहेना?"

तीं टिपणें हस्तगत करण्यासाठीं आपण परतूं नये असें आम्हीं विचाराअंतीं ठरलें. तो मजकूर म्हणजे एखादें कुचकामी चिठोरें आहे असें समजून मोलकरीण तें फेकून देईल. बरें एखाद्या बातमीदाराच्या हातीं जरी तो कागद पडला, तरी त्यांतील सांकेतिक भाषेचा त्याला उलगडा होणार नाहीं, माझे हस्ताक्षरहि त्याला कळणार नाहीं, अशी आम्हीं आपल्या मनाची समजूत करून घेतली नी पुढें निघालों. झालेल्या प्रकाराची हुरहूर मात्र मला एकसारखी लागून राहिली होती.

या प्रकरणाचा शेवट मात्र आनंददायक झाला. आम्हीं तेथून निघाल्यानंतर तें चिठोरें तेथील एका नोकराच्या हातीं आलें. त्यानें तें माझें म्हणून ओळखलें; पण त्या मोठ्या मनाच्या माणसानें तें न वाचतां आपल्या जवळ ठेवलें. कांहीं वर्षांनीं सर हॅरॉल निकल्सन हे इंग्रज साहित्यिक त्याच हॉटेलांत उतरण्यास आले. सर हॅरॉल्ड हे एक जबाबदार इंग्रज गृहस्थ आहेत, असें पाहून त्या नोकरानें तीं चिठी ठेवलेलें बंद पाकिट त्यांस दिलें व तें मजकडे पाठविण्याची त्यांना विनंती केली-त्यांनी नंतर ती चिठ्ठी मजजवळ आणून दिली. ● ●








अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

उपस्थितांच्या दृष्टिकोनांतून—



# महाराष्ट्र व्यापारी व औद्योगिक परिषद

दीपावलीच्या ऑगस्टच्या अंकांत 'दीपमाळा' या सदरांत श्री. पिनाकि यांनीं जुलै महिन्यांत मुंबई येथें भरलेल्या महाराष्ट्र व्यापारी व औद्योगिक परिषदेवर एक लहानसें पण मार्मिक स्फुट लिहिलें होतें. या स्फुटासंबंधीं आपली प्रतिक्रिया व्यक्त करणारीं अनेक पत्रें दीपावलीकडे आलीं आहेत. महाराष्ट्रांतील उद्योगपतींनीहि त्यासंबंधीं आपले विचार व्यक्त केले. त्यांतील दोन निर्भीड पत्रें वानगीदाखल देत आहोंत.

तारीख २१ जुलैच्या मुंबईच्या लोकसत्ता दैनिकाच्या अंकांत कोणी एका त्रस्त व्यापाऱ्यानें महाराष्ट्र व्यापारी व औद्योगिक परिषदेबाबत प्रदर्शित केलेले विचार वाचून बरे वाटले. जे झाले त्याचे समालोचन निरनिराळ्या दृष्टिकोनांतून होणें जरूरच आहे. त्यामुळेंच पुन्हां अशा परिषदांचे आयोजन करतांना त्यांतील त्रुटींची अगर उणीवांची पुनरावृत्ति टाळणें शक्य होईल.

वरील परिषदेचे लहान व मध्यम व्यापाऱ्यांचे दृष्टीनें मूल्यमापन करणें फार कठीण आहे. परिषदेच्या नांवाखालीं जें जें झाले त्यास खरोखरी काय म्हणावें हाच मोठा प्रश्न आहे. सर्वसाधारणपणें परिषद या शब्दानें जो अर्थ ध्वनित होतो त्याचा या परिषदेशीं सुतराम संबंध दिसत नाहीं. महाराष्ट्राचा व्यापारी व औद्योगिक विकास घडविण्यास सहायभूत ठरेल असे या परिषदेच्या कार्यवाहीतून काय काय निष्पन्न झाले हे उमगणें येरागबाळाचे काम तर खासच नव्हे.

उद्घाटनाच्या व भोजनोत्तर भाषणांतून महाराष्ट्रांच्या राजकार्यधुरंधर मंडळींनीं जे सांगितले त्यामुळें महाराष्ट्रांतील व्यापार उदीम वाढण्यास अगर अस्तित्वांत असलेल्या उद्योगधंद्यांपुढें आज असलेल्या अडीअडचणींचें निवारण होण्यास किती सहाय्य होईल हाहि संशोधनाचाच विषय ठरेल.

निरनिराळ्या विषयावरील उपसमित्यांचे कामकाजांतून झालेली फलनिष्पत्ति देखील अशक्यच आहे. नव्या महाराष्ट्र राज्याचे औद्योगिक उत्कर्षाचे मनोरथ उभे करतांना त्यांच्या सिद्धतेबद्दल मात्र अगदींच परिमित विचार केला गेला आहे असे खेदानें म्हणावे लागते. आज विविध अडचणींना तोंड देत देत स्पर्धेच्या धकाधकींत कसेबसें अस्तित्व टिकविण्याचा प्रयत्न करणाऱ्या लहान व मध्यम उद्योगधंद्यांच्या अडचणी निवारण करण्याबाबतचा विचार तर नाममात्रच झाला आहे.

दोन दिवसांच्या या कार्यक्रमांत एकच कार्य विशेष भरीव स्वरूपांत पार पडल्याचे याठिकाणीं नमूद करणे आवश्यक आहे. ते म्हणजे आलीशान अतिथीगृहांत झालेल्या शानदार जेवणावळी जेथें झडल्या तो महाराष्ट्र हाच याबद्दल परिषदेस उपस्थित राहिलेल्याची निश्चितच खात्री पटली असेल. परिषदेच्या एकूण कार्याचा आढावा घेतांना ही एक गोष्ट जरूर जमेच्या बाजूस धरावी लागेल. आमचे राज्य अस्तित्वांत येताच आमची ऐतिहासिक परंपरा चालू ठेवण्याचे कार्य अन्य कोणत्याहि कार्यापेक्षां जास्त निष्ठेने आम्ही करीत राहूं हाच या मोठ्या व महत्त्वाच्या परिषदेच्या कार्याचा निष्कर्ष काढल्यास माझ्याशी कोणी असहमत होईल असे वाटत नाहीं.

—संवेदनाशील

### एक फार्स

लोकसत्ता दैनिकाच्या गेल्या ११ तारखेच्या अंकांतील एका त्रस्त व्यापाऱ्याचा महाराष्ट्र व्यापारी व औद्योगिक परिषदेबाबतचा लेख वाचनांत आला. लेखक स्वतःस त्रस्त म्हणवीत असूनहि अत्यंत सौम्य व सोज्वळ भाषेंत त्या सद्‌गृहस्थानें आपले मतप्रदर्शन केले आहे. खरोखरी याहून कितीतरी जळजळीत भाषेंत छोट्या धंदेवाईकांनीं बोलावें अगर लिहावें अशाप्रकारें या परिषदेचा बनाव घडविण्यांत आला आहे.

एक मोठे नाटक रचले गेले. त्याची भरपूर जाहिरातबाजी केली गेली. प्रतिनिधींना मोठमोठ्या आमंत्रण-पत्रिका पाठविण्यांत आल्या. वजनदार नांवांचे मदतीनें हें सर्व सुसूत्रपणें करण्यांत आले व प्रत्यक्षांत मात्र मोठमोठ्या अपेक्षा बाळगून आलेल्या छोट्या व्यापाऱ्यांची घोर वंचना करण्यांत आलेली आहे. नव्या महाराष्ट्र राज्याचा औद्योगिक व व्यापारी विकास घडवून आणण्यासाठीं भरविण्यांत आलेल्या या परिषदेंत त्यादृष्टीने खरोखरी महत्त्वाच्या व विचारणीय अशा कित्येक सूचना विचारांतहि घेतल्या गेल्या नाहींत. अत्यंत तिरस्कारणीय रीतीने अशा सूचनांची उपेक्षा करण्यांत आली. सहा विभागीय समित्या नेमून त्यांचे प्रमुखस्थान नामांकित अशा उद्योगपतींनीं भूषविले होते. त्यामुळेच कदाचित् छोट्या धंदेवाईकांच्या अडचणींकडे सहानुभूतिशून्यतेने पाहिले गेले असावें.








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

सहापैकीं पांच समित्यांचा सर्वसाधारण व्यापारी मंडळीशी विशेष संबंध नव्हता. परंतु उद्योग व कामगारविषयक समितीबद्दल सर्वांनीं भरपूर आस्था दाखविली. परिषदेसाठीं आलेल्या सुमारे आठशें प्रतिनिधिपैकीं सुमारे अडीचशें प्रतिनिधिंनी या समितीचे कामांत भाग घेतला. परंतु कित्येक विचारार्ह सूचनांची उपेक्षेने वासलात लावण्यांत आली व अगदी जुजबी फेरफारासह प्रतिनिधींना मार्गदर्शक म्हणून पाठविण्यांत आलेला अहवालाचा मसुदा कायम करण्यांत आला. इतकेच करण्यासाठी वास्तविक या सर्व अवडंबराची मुळीच आवश्यकता नव्हती. फेटाळण्यांत आलेल्या कांहीं महत्वाच्या सूचनांची तपशिलवार माहिती उदाहरणादाखल खाली देत आहे.

(१) अकोल्याचे श्री. महाजनी यांनीं उद्योगधंद्याचे छोटे, मध्यम व मोठे असे वर्गीकरण करण्यांत यावे असे सुचविले होते. इतरहि कांहीं प्रतिनिधींनी वेगवेगळ्या शब्दांत हीच मागणी केली. परंतु अहवालांत या

## कुठुन कुठुन आणीलेस

कुठुन कुठुन आणीलेस
बांधाया पाश असे
सोडवीत असतांना
अधिकच मी गुंततसे

कुठुन कुठुन नजरेला
धार अशी लावलीस
जखमेची चटक मला
घोर कशी लावलीस

कुठुन कुठुन शब्द असे
हुकुमी तूं शोधलेस
अवघड त्या अर्थानें
कायमचे बांधलेस

—शिरीष पै




विवाह प्रसंगीं भेट देण्यायोग्य हिंदी व मराठी भाषांमधील अनुपम ठेवा -- असें




शृंगार नायिका

लेखक : स. आ. जोगळेकर, 'सह्याद्रि'कर्ते
चित्रें : दीनानाथ दलाल

हें पुस्तकच निवडा

- पुस्तकाचा आकार : १०" × १३"
- पृष्ठ संख्या ८४
- कागदप्रकार मोहरदार
- बांधणी जाड पुठ्ठा
- मूल्य : रु. १२॥ + १। पोस्टेज
- माउंटवर चिकटविलेलीं, फोटो ऑफसेटनें छापलेलीं अनेकरंगी नयनमनोहर १० चित्रें आणि रंगांत छापलेलीं ६० वर कलापूर्ण रेखाचित्रें !



प्रकाशक : दलाल आर्ट स्टुडिओ ४२, केनेडी ब्रीज — मुंबई ४





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरियल ट्रस्ट



## प्रार्थना

मायेच्याच पोटी – विसरलो नाम
दुरावलो राम – अंतरिचा ॥ १ ॥

आयुष्य हे गेले – गेले क्रियेवीण
माझी तुज आण – सांभाळी तूं ॥ २ ॥

आलो मी राऊळा – जोडियले हात
परी मम चित्त – नाहीं तेथे ॥ ३ ॥

हिंडलो बाजारी – खरीदण्या प्रेम
आंचविले नाम – राया तूझे ॥ ४ ॥

दिस हे मोलाचे – गमविले सारे
तरी नाम प्यारे – घडो नये ? ॥ ५ ॥

चित्त हे अस्थिर – भटकते दूरि
आणाया सामोरी – हतबल ॥ ६ ॥

तूंच देवा मीहि – मीहि दिसो तूंच
लागो हीच आंच – हृदयामाजी ॥ ७ ॥

*– नारायण एकनाथ आगटे*

---

मागणीचा उल्लेखहि करण्याचे सौजन्य समिती-प्रमुखानी दाखविलें नाहीं. श्री. महाजनी यांनी प्लेनरी सेशनमध्ये याच मागणीचा पुनरुच्चार केला. त्यावेळीं समिती प्रमुखांनी त्यावर केलेल्या भाष्याचा आशय असा कीं आज छोट्या उद्योगाचे स्वरूपांत सुरू होणारा धंदाच कांहीं कालानन्तर मध्यम किंवा मोठा होतो. म्हणून निश्चित वर्गवारी करतांना घोटाळे निर्माण होतील. या खुलाशाचे योग्यायोग्यतेचा विचार वाचकांनीच करावा.

( २ ) नागपूरचे श्री. गोएंका यांनी सुचविले होते कीं सरकारी संस्थानी इमारतीचें बांधकाम करतांना स्थानिक उद्योगधंद्यांना प्रोत्साहन देण्याचे दृष्टीनें टाईल्स, फिटींग्ज यासारखे साहित्य जेथें जेथें उपलब्ध होऊं शकेल तेथें तेथें कटाक्षानें स्थानिकच वापरावे. यासाठी उदाहरण म्हणून नागपूर मेडिकल कॉलेजचा उल्लेख केला. नागपूरला टाईल्स तयार होत असूनहि त्या न वापरतां टाईल्स मुंबईहून मागविण्यांत आल्याचे त्यांनी सांगितले ही एक स्वागतार्ह सूचना होती. सरकारचें हल्लीचे धोरणाप्रमाणे आज जो जो माल देशांत तयार होतो त्याचे गुणावगुणांचा विशेष विचार न करता त्याच प्रकारच्या परदेशी मालाची आयात बंद करून देशी उद्योगधंद्यास उत्तेजन दिले जाते. याच न्यायानें देशाच्या सर्व भागांत उद्योगधंद्यांचा विकास होण्याचे दृष्टीनें वरील सूचना मौलिक होती. परंतु समिती-प्रमुखांनी सुचविणाराचे बोलण्याचा शब्दच्छल करून ही एक वैयक्तिक बाब ठरविली व फेटाळली.

( ३ ) पुण्याचे श्री. गांगल यांनीं मुद्रण धंद्यावरील हल्लीच्या अन्याय्य सरकारी निर्बंधामुळें धंद्यावर प्रतिदिनी होत असलेल्या प्रतिकूल परिणामांची माहिती देऊन त्यामुळें लहान लहान प्रेसमालकांची होणारी मुस्कटदाबीबाबत उपाययोजनेची मागणी केली. पण अहवालांत या मागणीचा मागमूसहि दृष्टोत्पत्तीस आला नाहीं.

( ४ ) सिन्नरचे श्री. सारडा यांनी विडी धंद्यावरील आजच्या जाचक निर्बंधामुळें या धंद्यावर प्रतिदिनी होत असलेल्या विपरित परिणामांची माहिती दिली. या राज्यांतील विडी उद्योगाचे महत्त्वाचे स्थान त्यांनी योग्य माहितीचे आधारे विशद करून सांगितले. व या धंद्यांतील विशिष्ट पद्धतिस अनुसरून याचे नियमनासाठीं स्वतंत्र कायदा केला जावा अशी मागणी केली. याहि मागणीचा मागमूस अहवालांत मुळीच केला गेला नाहीं.

वर वानगीदाखल कांहीं ठळक उदाहरणे दिली आहेत. या व अशा कित्येक सूचनांना केवळ अनुल्लेखानेच मूठमाती देण्यांत आली. यावरूनच परिषदेचे एकंदर कामकाज कशाप्रकारे झाले याची वाचकांना कल्पना येईल. या सर्व गोष्टी सहजासहजी शक्य व्हाव्यात म्हणूनच कीं काय परिषदेच्या व्यवस्थापकांनींहि या कामीं सक्रिय हातभार लावला. तो असा कीं प्लेनरी सेशनमध्ये जेव्हां विषयवार विभागीय समि त्यांचे अहवाल सादर करण्यांत आले त्यावेळीं तत्संबंधीचे कोणतेहि कागद वा पुरवणीपत्रकांच्या प्रति नेमक्या त्यावेळीं उपस्थित प्रतिनिधींच्या हाती न पडतील याची त्यांनी दक्षता घेतली. त्यामुळें वरीलप्रकारच्या सूचना अथवा समस्या मांडणाऱ्या प्रतिनिधींना आपल्या सूचनेची काय वासलात लागली याचा योग्यवेळी पत्ताच लागू शकला नाहीं. या एकंदर प्रकारावरून या परिषदेबाबत या लेखाचे सुरवातीसच व्यक्त केलेली तीव्र शब्दांतील प्रतिक्रिया वाचकांनाहि पहावी अशी अपेक्षा आहे,

**— निरीक्षक**

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# प्र ं का . श ं रे . खा



या महिन्यांतील
तीन प्रमुख चित्रें

## ❊ मुगले आझम ❊ चौदहवींका चाँद ❊ मिरॅकल

पैसा, परिश्रम आणि फिल्म यांचा अपव्यय !

### मुगले–आझम्

निर्मितीसाठीं लागलेलीं वर्षें, त्यावर ओतण्यांत आलेला पाण्यासारखा पैसा आणि त्यानंतर त्याची झालेली 'न भूतो न भविष्यति' अशी जाहिरात यामुळें मुगले आझम हें प्रकरण आहे तरी काय, अशी उत्सुकता चित्रपटविषयांशीं सुतराम् संबंध नसलेल्या मंडळींच्या मनांतहि निर्माण झाली. पण प्रत्यक्ष पाहातां या अवाढव्य प्रकरणांत पैशाची वारेमाप आणि विनाकारण उधळपट्टींच झालीय असं कुणाचंहि मत व्हावं. अनारकलीच्या ऐतिहासिक दंतकथेवर या चित्रपटाच्या कथानकाची उभारणी. पण याच कथानकावर फिल्मीस्तांनचा एक चित्रपट आपल्या लोकप्रिय गीतांमुळें असा कांहीं गाजला कीं चित्रपट शौकिनांना मुगले आझम पाहातांना त्याची वारंवार आठवण व्हावी.

मोगल सम्राटांच्या ऐन वैभवाच्या कारकीर्दीतील भव्यतेची साक्ष या चित्रपटांतील प्रचंड सेटिंग्जनीं पटते. पण त्यांतहि जेमिनीच्या सनसनाटी चित्रपटांतील भव्य देखाव्यांपेक्षां खास वेगळे असें कांहींच नाहीं. आजकाल चित्रपटांच्या लोकप्रियतेचा प्राण म्हणजे संगीत. पण येथें त्याचाहि निकाल लागलेला आहे. विशेषतः बडेगुलाम अलीखांसारख्या ख्यातनाम गवयाचा उपयोग करूनहि त्यांना तानसेन सजीव करतां आला नाहीं. बाकी इतर गाण्यांची कथा विचारूंच नका.

शीशमहालमधील नृत्याच्या रंगीत चित्रीकरणाचा फार बोलबाला करण्यांत आला आहे. पण शांतारामच्या 'झनक [illegible]' ची स्मृति अजूनहि ताजी असल्यामुळें प्रेक्षकांना त्यांत कसलेंच नावीन्य वाटत नाहीं. चित्रपटांतील आणखी एक महत्त्वाचा प्रसंग म्हणजे युद्ध. त्याची दृश्यें खरोखरच चांगली आहेत. पण त्याचें श्रेय दिग्दर्शक आणि निर्मात्याला न जातां भारत सरकारच्या संरक्षण खात्याच्या सहकार्यालाच दिलें पाहिजे.

या चित्रपटांतील प्रमुख भूमिकांसंबंधीं लिहिण्यासारखें कांहींच नाहीं. यांत पृथ्वीराजनें अकबराची भूमिका केलीय. इतिहासवाचकांच्या मनांत ज्या अकबराची मूर्ति ठसली आहे त्याच्या अगदीं विरुद्ध अशी प्रतिमा पृथ्वीराजनें निर्माण केली आहे. यांतील अकबर हा मोंगल सम्राट नसून एकाद्या पेंढाऱ्यांच्या किंवा जाटांच्या टोळीचा दांडगा पुढारी वाटतो. दिलीपकुमारची चेहेरेपट्टी राजकुमाराला शोभेशी नाहींच, त्यामुळें चित्रपटांतील अकबराचा तो सख्खा मुलगा वाटतो. पृथ्वीराज यांत नाटकी पद्धतीनें बोलतो आणि आपल्या दृष्टीनें अभिनयाची कमाल करतो. परंतु हा सर्व प्रकार त्यांतील निम्म्याहून उर्दू कळत नसल्यामुळें प्रेक्षकांना कमालीचा असह्य होतो.

मधुबालेविषयीं काय लिहावें. ती दिसायला सुरेख आहे आणि कारुण्याचा आविष्कार सहजतेनें करते. पण चित्रपटांतील एकंदर धांगडधिंग्यांत तिच्या भूमिकेचा ठसा रहातच नाहीं. दुर्गा खोटे ही आतां रिटायर्ड मराठी नटी जोधाबाईच्या भूमिकेंत वावरलीय. पण तो म्हणजे मूर्तिमंत म्हातारा बालगंधर्व वाटतो. आणि त्यामुळें तिचा नखरा लाडिकपणा आणि प्रेमळपणा अक्षरशः असह्य होतो.

पण इतकं असूनहि मुगले आझम प्रेक्षकांनी एकदां पाहिलाच पाहिजे. कारण पैसा, परिश्रम आणि फिल्म यांचा भरमसाट अपव्यय कसा करतां येतो याचें हें एकमेव आलिशान उदाहरण !

एक रम्य दिग्दर्शन

### चौदहवी का चाँद

आजकाल हिंदी चित्रपट पाहायला जातांना भय वाटतं. न जाणों आपल्या डोळ्यांना किती यातना देणार आहे कोण जाणें ? पण त्यांतल्यात्यांत बिमल रॉय, गुरुदत्त यांच्यासारख्या जाणत्या मंडळींचा चित्रपट धीर धरून पहायला मुळीं हरकत नाहीं.

मराठी संस्कार घडलेल्या गुरुदत्त यांच्यासारख्या चोखंदळ आणि कुशल दिग्दर्शकानें यावेळीं मात्र निर्मात्याची भूमिका यथायोग्य पार पाडून एक सुरेख चित्रपट रसिकांना सादर केला आहे. प्यासा या भावरम्य चित्रपटामुळें गुरुदत्ताबद्दल फार मोठ्या आशा निर्माण झाल्या होत्या. पण त्यांमानानें 'कागज के फूल' या चित्रपटानें कमकुवत कथेमुळें प्रेक्षकांची निराशा केली.

यावेळीं एम्. सादिक यांनीं चौदहवीका चाँद मधील चटका लावणारी प्रणयकथा अत्यंत कुशलतेनें चित्रित केली आहे. वहिदा रेहमान ही गुरुदत्तांच्या चित्रपटांतील अपरिहार्य नायिका–पण तिनेंहि आपलें काम खूप समजून केलें आहे. पण अभिनयांतील खरी स्पर्धा गुरुदत्त आणि रेहमान यांच्यांतच आणि ती अखेर रेहमाननें जिंकली आहे. लखनौच्या नबाबी वातावरणांतील ह्या प्रेमकथेंत माझ्या मतें जॉनी वॉकर सारखा विदूषकी नट प्रथमच संयमानें वागला आहे. तरीपण अधून मधून







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

आचरटपणाचा मोह त्याला आवरत नाहीं. गोड गीतें हा आजकाल चित्रपटांचा प्राण. या चित्रपटाचें संगीत दिग्दर्शन, दिग्दर्शक रवि यांच्या कीर्तीत भर टाकणारें झालें आहे. सर्वच नटांचें समंजस सहकार्य आणि रेखीव अभिनय यामुळें गेल्या चारदोन वर्षांत या चित्रपटासारखा चित्रपट पहायला मिळायला नाहीं असेंच कुणीहि म्हणेल.

• • •

**इंग्रजी संतपट •**

## मिरॅकल

साहेबसुद्धां चमत्कार करूं शकतो आणि चमत्कारावर विश्वास ठेवतो यावर चट्कन आपला विश्वास बसत नाहीं. गेल्या महिन्यांत इरॉस येथें लागलेल्या मिरॅकल या संतपटानें मराठी प्रेक्षकांची भरपेट करमणुक होईल. भव्यता भव्यता म्हणून जें कांहीं म्हणतात, तें खरोखरीच बघावयाचें असेल तर त्यांनीं मिरॅकल पाहिलाच पाहिजे. त्यांत देवीचा पुतळा नाहींसा होऊन अगदीं जनाबाईची आठवण यावी अशा पद्धतीनें देवी एका अश्राप मुलीचें रूप घेऊन वावरते आणि ती अश्राप मुलगी चार पांच ठिकाणीं प्रणयाचे खेळ करून पुनरपि चर्चमध्यें येते आणि तिच्या पलायनामुळें वैराण झालेल्या त्या खेड्याला पुन्हां पाऊस येतो आणि सुकाळ होतो असा या नेत्रदीपक संतपटाचा भावार्थ. भाविकांनीं तन्मय होऊन पहावेत आणि टाळ्या द्याव्यात असे अनेक प्रसंग या चित्रपटांत आहेत. आणि शिवाय त्याला नाना रंगाची भर !

मात्र को वाडिस, सॅमसन् डिलायला, टेन कमांडमेंटस् यांच्या परंपरेंत बसणारा एक प्रेक्षणीय चित्रपट एवढेंच या चित्रपटाचें कौतुक करतां येईल.

• • •

---

( पान ७ वरून चालू )

ग्रेइ न कां गे हरि हा अजुनी
पुसते सखिते फिरुनी फिरुनी
विस्मरतें न स्मरे ॥ राधा ॥ ४ ॥
कवळुनि चुंबी घनतिमिराही
आला शामसखा ग बाई
देहभान विसरे ॥ राधा ॥ ५ ॥
विलंब होता वासकसज्जा
रडे स्फुंदुनी सोडुनि लज्जा
तुजसाठीच झुरे ॥ राधा ॥ ६ ॥
जयदेवाची प्रसन्न रसना
रसिक जनाच्या पडतां श्रवणा
सुधानंद वितरे ॥ राधा ॥ ७ ॥

\+ + +

**( प्रबंध बारा समाप्त )**

ही पुरे गडे रतिलीला
जीव हा शिणला
रे सोड मला ब्रिजलाल ॥
श्रृंगाररसाचा सिंधू
त्यांत अवगाही
राधिका पडे संमोही
'ऊंहु उंहु' सुरत सत्कार
टाकि सित्कार
अंग चोरोनी
कुच संकोचे झांकोनी
थरथरतो अंगीं काटा
हा शाम फार ग खोटा
चुंबितो कवळुनी ओठा, लाजऱ्या गाला
'रे सोड मला ब्रिजलाला'
प्रणयाचा चालवि खेळ
लहरीत रमे किती वेळ
जणुं उभा पुढे घननीळ
बोलते मनाशिच विकला
'रे सोड मला ब्रिजलाला'
रोमांचित तनु ये थकवा
मुखि स्वेद बिंदु थरकावा
लटकाच धरावा रुसवा
करि हाव भाव हा फसवा
रंगवीत शीलनलीला
'रे सोड मला ब्रिजलाला

*

तरुवरति पांखरें उडति, स्वैर किलबिलती
होय मनि भ्रांती
आलाच सखा एकांतीं
श्रृंगारसाज लेउनी मुदित कामिनी
सजविते शेज
लटकीच खुणेची नीज
वाटते रुसावे जरा
बघुनि प्रियकरा
दूर हो सरा
जवळि नच यावे
गालांत हळुच हासावे
ही अशी प्रणयचेष्टितें, सखी कल्पिते
कंठिते रजनी
स्मरविह्वल तुजवाचोनी.

× × ×

( वृत्त- शार्दुलविक्रीडित )

पांथा थांबु नकोस, वारुळ तिथें अंधारलें भोवतीं
खेळे कृष्ण भुजंग सांज ढळतां औदुंबराखालती
आहे नंदनिवास गोकुळ पुढें, जाई मुदें येथुनी
चातुर्यें सुचवी रहस्यस्थल तें संकेत संगोपनीं
राधेचे वच सांगतो पथिक तो येतांच नंदाघरीं
'राधा सोडवि संकटांतुनि तुला' बोले तया श्रीहरी

**'सोत्कंठ-वैकुंठ'** सर्ग समाप्त.

\+ × • ×

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून
दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

# वार्षिकांची परंपरा--

१६ वर्षांपूर्वी 'दीपावली' वार्षिकाचा जन्म झाला—

मराठींतील हें पहिलें आणि आघाडीवरचें वार्षिक !

या नंतर अनेक वार्षिकें आलीं.नी गेली---अजूनहि कांहीं अवतरत आहेत.

पण **दीपावली** चीं

*सर कुणालाच नाहीं, असा रसिकांचा कौल.*

*आणि या वर्षींहि मराठी वाचकांचें हें आवडते*



# दीपावली

वार्षिक १९६०

वर्ष १६ वें



मोठ्या दिमाखानें सहर्ष सादर करीत आहे.

- नवरसांचा आविष्कार करणाऱ्या ऑफसेट पद्धतीनें छापलेल्या १२ कलाकृति.
- आकर्षक आगळें शतरंगी मुखपृष्ठ.
- नामवंतांचे आणि ज्ञानवंतांचें ललित व विचारप्रक्षोभक वाङ्मय.
- व्यंगचित्रें --विंगचित्रें हास्यचित्रें--चित्रेंच चित्रें.
- गेल्यावर्षी दीपावलीचा वार्षिक अंक (संपल्यामुळें) मिळाला नाहीं म्हणून निराश झालेल्या रसिकानों, इतिहासाची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून रु. १२.५० वार्षिक वर्गणी भरून आजच वर्गणीदार व्हा व तिप्पट किंमतीचा हा विशेषांक त्याच वर्गणींत घरपोंच मिळवा

## ❀ दीपावली हिंदी (वर्ष आठवें)

आपल्या नेहमींच्या वैभवानें याचवेळीं प्रसिद्ध होईल.

पृष्ठें २०० च्या वर  किं. रु. ३ + र. पो. १ रु

एजंटांनीं आपली मागणी १५ सप्टेंबरच्या आंत करावी. अधिक माहितीसाठीं नियम व अटींचें माहितीपत्रक मागवावें.

---

प्रकाशक : दलाल आर्ट स्टुडियो, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई नं. ४

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

